


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११७ एप्रिल–मे–जून १९५६

## या अंकांत



◆ ◆ ◆

संपादकीय पत्रव्यवहाराचा पत्ता :

१२६ डी. फणसवाडी,
मुंबई २.

◆ ◆ ◆

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

◆ ◆ ◆

• • •

## केशवसुत

## कला आणि काव्य

• • •

संपादक—वि. स. खांडेकर

चार रंगी मुखपृष्ठ

किंमत: —दोन रुपये आठ आणे

प्रकाशक :—देशमुख आणि कंपनी

२२ कसबा,—पुणें २.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३०, अंक ११७ एप्रिल–मे–जून १९५६

# संपादकीय

## ' आनन्द ' मासिकाचें अर्धशतक

महाराष्ट्रांतील गेल्या पिढींतील एक कल्पक नि ध्येयवादी ग्रंथकार कै. वासुदेव गोविन्द आपटे यांनी सुरू केलेल्या ' आनन्द ' या बालमासिकाला ता. १ जुलै १९५६ रविवारीं पन्नास वर्षें पूर्ण झालीं. या निमित्ताने ' आनन्द 'च्या विश्वस्तांनी त्याच दिवशीं पुणें येथे न्यायमूर्ति गजेन्द्रगडकर यांच्या अध्यक्षतेने मासिकाचा सुवर्णमहोत्सव साजरा केला. याच वेळीं ' आनन्द 'चा सुवर्णमहोत्सव विशेषांकहि प्रसिद्ध करण्यांत आला असून, त्यांत त्या मासिकाच्या गेल्या पन्नास वर्षांचा साग्रंत इतिहास देण्यांत आलेला असल्यामुळे 'आनन्द'. मासिकाने केलेल्या कामगिरीचा आढावाहि पर्यायाने ' आनन्द ' च्या आजच्या वाचकांना उपलब्ध करून दिला आहे.

' आनन्द ' मासिक पन्नास वर्षांपूर्वी सुरू झालें त्या वेळीं मराठींत विनायक कोंडदेव ओक यांचें ' बालबोध ' व अमेरिकन खिस्ती मिशनचें ' बालबोध मेवा ' हीं लहान मुलां-साठी निघालेलीं मासिकें लोकप्रिय झालेलीं होतीं. मुलांच्या अंगचे सद्‌गुण वाढावे आणि दिवसेंदिवस मुलें शहाणीं आणि सुखी व्हावीं यासाठी प्रयत्न करणें हें ओकांच्या 'बालबोध'चें ध्येय होतें व म्हणून तें विशेष लोकप्रिय झालें. पण अल्पवयी मुलांत खिस्ती धर्माचा प्रसार करणें हा ' बालबोध मेवा ' या बालमासिकाचा प्रच्छन्न उद्देश असल्यामुळे तें मासिक फारसें लोकप्रिय होऊं शकलें नाही. अर्थात् , या दोन मासिकांना टक्कर देऊनच कै. आपटे यांना आपल्या ' आनन्द ' मासिकाची उपयुक्तता पटवून देण्याची बिकट कामगिरी करावयाची होती. ही वस्तुस्थिति लक्षांत घेतली म्हणजे ' आनन्द 'ने केलेल्या कामगिरीचें महत्त्व विशेष लक्षांत येतें. इतकेंच नव्हे तर ' आनन्द ' नंतरहि महाराष्ट्रांत अनेक बालमासिकें निघालीं व अल्पावधींत तीं बंदहि पडलीं हें लक्षांत घेतलें म्हणजे कै. आपटे यांची पद्धति व परंपरा 'आनन्द' ने आजचे कल्पक संपादक श्री. गोपीनाथ तळवलकर व त्यांचे सहकारी यांनी किती निष्ठेने चालविली आहे यावरहि चांगलाच प्रकाश पडतो. ' हसत खेळत बुद्धिविकास ' हेंच

ध्येय डोळ्यांपुढे ठेवून ' आनन्द ' मासिक जन्मास आलें. त्या दृष्टीने मुलांच्या कल्पकतेला व जिज्ञासु अगर चौकस वृत्तीला परिपोषक होतील अशा मनोरंजक गोष्टी, मनोरंजक व उद्बोधक माहिती, चित्रें, मुलांची बौद्धिक भूक भागवितील अशीं कोडीं वगैरे विविध विषय 'आनन्दां'त देऊन मुलांचें रंजन व उद्बोधन ' आनन्द ' मासिकाने केलें आहे, आजहि तेंच कार्य चालू आहे. आजचे बरेचसे प्रथितयश लेखक हे त्या वेळचे 'आनन्द'चे बालवाचक होते व त्यांपैकी अनेकांची कल्पनासृष्टि अगर ध्येयसृष्टि फुलविण्याचें कार्य ' आनन्द 'ने केलेलें आहे. या लेखकांपैकी पुष्कळसे आता सेवानिवृत्त अगर कार्यनिवृत्त झालेले असले तरी ' आनन्द 'चें कार्य अद्यापि अविरत सुरू आहे. ही घटना जितकी कौतुकास्पद तितकीच ती आजच्या ' आनन्द ' मासिकाच्या चालकांना भूषणास्पदच म्हटली पाहिजे. मराठी मासिकाचें हें यश अभिनन्दनार्ह होय.

गेल्या वीस-पंचवीस वर्षांत ' आनन्द ' मासिकाला जें आकर्षक स्वरूप प्राप्त झालेलें आहे त्याचें बव्हंशीं श्रेय श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या कल्पक व लालित्यपूर्ण संपादनालाच आहे यांत शंका नाही. आजचा बालवाचक हा कै. आपटे यांच्या काळच्या बालवाचका-पेक्षा अनेक दृष्टींनी चौकस व बहुश्रुत झालेला आहे ही वस्तुस्थिति ओळखून त्याच्या वाढत्या बौद्धिक गरजा भागविण्याचें कार्य आजच्या कालानुरूप संपादक करीत आहेत, हें ' आनन्द'चें वैशिष्ट्य आहे. वाङ्मय, चित्रकला व इतर विविध विषयांतील मनोरंजक माहिती देण्या-बरोबरच प्रचलित राजकीय व सामाजिक प्रवाहांचा परिचयहि प्रौढ विद्यार्थ्यांना करून देण्याचें अवश्य कार्य ' आनन्द ' करीत आहे. ' आनन्द ' च्या या संपादकीय बाजूप्रमाणेच त्याच्या व्यवस्थेची बाजूहि विश्वस्तांनीं चोख ठेविलेली असल्यामुळेच ' आनन्द ' मासिक आजचे हे दिवस पाहत आहे. 'आनन्द' मासिकाचा असाच उत्कर्ष होऊन कालाच्या फलकावर त्याचें शतक फडकावलेलें पाहण्यास मराठी वाचकांना मिळो हीच इच्छा आहे. सुवर्ण-महोत्सवाबद्दल मी 'आनन्द' मासिकाचें अभिनन्दन करतों.

## ' कॉपी-राइट ' विधेयक

कॉपी-राइटचा सध्या असलेला कायदा सुधारण्याच्या हेतूने, भारत सरकारच्या शिक्षण-खात्याने तयार केलेली एक योजना विधेयकाच्या स्वरूपांत नुकतीच राज्यसभेंत मांडण्यांत आली आहे. हें विधेयक सध्या चिकित्सा-समितीकडे विचारार्थ गेलें असून, त्या विधेयकावर वृत्तपत्रांत व लेखकांच्या सभा-संमेलनांत जाहीर चर्चा सुरू आहे. विधेयकाचा हा मसुदा जरी सुधारणा करण्याच्या उदात्त हेतूने तयार करण्यांत आला असला तरी लेख-कांच्या हितसंबंधांना सर्वस्वीं बाध आणणारा किंबहुना प्रतिगामी स्वरूपाचा आहे व म्हणून तो बदलून घेण्यासाठी लेखक व कलावन्त यांनी सर्व देशभर जोराची चळवळ चालविली आहे. लेखकांच्या बौद्धिक मिळकतीच्या हक्कावर गदा येऊं नये म्हणून लेखकांनी एव्हाच जागरूक राहिलें पाहिजे.

या विधेयकांतील लेखकांच्या दृष्टीने सर्वस्वीं अनिष्ट अशीं कांही कलमें थोडक्यांत पुढीलप्रमाणे सांगतां येतील—

( १ ) लेखकाने आपली कलाकृति सरकारने खास या कामासाठी उघडलेल्या कचेरींत नोंदवून घेतली पाहिजे. असें न केल्यास तिला कॉपी-राइट कायद्याचें संरक्षण मिळणार नाही.

अनुक्रमणिका

( २ ) वरीलप्रमाणे नोंदविलेल्या पुस्तकाचा हक्क लेखकाच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसाकडे ५०.वर्षांऐवजी फक्त २५ वर्षेच राहील.

( ३ ) एकापेक्षा अनेक लेखकांनी संयुक्तपणाने लिहिलेल्या ग्रंथाचे हक्क जो लेखक प्रथम कालवश होईल तेव्हापासून फक्त २५ वर्षेच इतर लेखकांकडेहि राहतील.

( ४ ) कॉपी-राइट रजिस्ट्रारला या विधेयकांत अवास्तव व अनावश्यक अधिकार देण्यांत आले आहेत. लेखकाच्या इच्छेविरुद्धहि ' सार्वजनिक हिता ' च्या गोंडस नांवाखाली त्याच्या कलाकृतीचें भाषांतर, ध्वनिमुद्रण आणि अन्य माध्यमांत रूपांतर करण्याचा अधिकार रजिस्ट्रारला देण्यांत आला आहे. वगैरे.

प्रत्येक लेखकाने हें संकल्पित विधेयक संपूर्णपणें काळजीपूर्वक वाचून त्यांतील आपल्या हितसंबंधांना जाचक व जुलमी ठरणाऱ्या कलमांबद्दल आपली तीव्र नापसंती सभा-संमेलनांतून वेळींच प्रकट केली पाहिजे. लेखकांच्या सर्व संघटनांनी या कार्यासाठी ठिकठिकाणीं सभा घेऊन या विधेयकाला आपला तीव्र विरोध असल्याचें शक्य तितक्या लौकर जाहीर करावें. असें झाल्यास आपलें लोकशाही सरकार लेखकांच्या हितसंबंधांचें संरक्षण करण्याच्या दृष्टीने जरूर त्या सूचना संमत करील याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाही. ● ● ●

वा. रा. ढवळे

त्र्यंबक विष्णु पर्वते

# आगरकर आणि टिळक

नेक नामदार श्रीनिवास शास्त्री मद्रास मुक्कामीं १९३६ सालीं गोखले-दिनानिमित्त 'गोखले व त्यांचे समकालीन' या विषयावर बोलत होते. सार्वजनिक जीवनाला प्रारंभ करतांना गोखल्यांना पहिलें दर्शन टिळक व आगरकर याच थोर पुरुषांचें झालें. आगरकरांबद्दल शास्त्री म्हणाले, "फर्ग्युसन कॉलेजचे हे दुसरे प्रिन्सिपॉल अल्पवयांत निधन पावले आणि त्यामुळे त्यांचें नांव अखिल भारतांत जितकें व जसें गाजावयास पाहिजे होतें तसें गाजलें नाही. आगरकरांच्या ठिकाणीं उदारमतवाद व न्यायबुद्धि हे गुण उत्कटत्वाने वसत होते. स्त्रियांचे ते मोठे कैवारी होते आणि स्त्रीजातीला हीन लेखण्यांत पुरुषजातीने केलेल्या अन्यायाबद्दल त्यांना मोठी चीड होती. गुदस्त सालीं ( १९३५ ) त्यांच्या नांवाला अद्यापि किती मान आहे याचा चांगला प्रत्यय आला. पुण्याला एक नवीन मुलींची इंग्रजी शाळा त्यांच्या नांवाने स्थापन करण्यांत आली तेव्हा अगदी थोड्या वेळांत फार मोठी रक्कम जमली व ती शाळा आपल्या पायावर उभी राहिली. अशी त्यांच्या नांवांत एकप्रकारची जादू होती. "

ही शाळा म्हणजे श्री. प्रल्हाद केशव अत्रे यांनी रास्ते वाड्यांत सुरू केलेली 'आगरकर हायस्कूल फॉर इंडियन गर्ल्स' ही संस्था होय. नेक नामदार शास्त्री यांनी आगरकरांविषयी जें कांही म्हटलें तें सर्व खरें आहे, परंतु तें किती अपुरें व तुटपुंजें आहे ! शास्त्रींसारख्या सहृदय व माहीतगार लोकधुरीणाला देखील इतकेंच आगरकरांविषयी बोलून थांबावें असें वाटलें यावरून त्यांनी स्वतःच खेदपूर्वक केलेल्या विधानाची सत्यता विशेषच ठसठशीतपणें मनाला पटते. महाराष्ट्राबाहेर खरोखरच त्यांच्याविषयी गाढ अज्ञान आहे यांत विशेष नवल नाही. परंतु महाराष्ट्रांत तरी त्यांच्याविषयींचें ज्ञान असें काय वाहून चाललें आहे ? कांही तरी निमित्ताने केव्हा तरी त्यांची आठवण कोणाला तरी होते त्या वेळीं कांही तरी जुळवाजुळव करून लिहिलें अगर बोललें जातें. त्यांच्या कारकीर्दीची आणि कामगिरीची यथोचित जाणीव असलेलीं शेपन्नास माणसें तरी अखिल महाराष्ट्राच्या तीन कोटि लोकसंख्येंत असतील काय ? शंका वाटते; आणि जीं कांही नांवें प्रस्तुत अल्पज्ञ लेखकाच्या नजरेसमोर येतात तीं खरोखर हाताच्या दहा बोटांवर संपणारींच आहेत.

यंदा चालू महिन्यांत आगरकर व टिळक या दोघांचा जन्म झाल्याला शंभर पावसाळे पुरे होतात व म्हणून त्या निमित्ताने दोघांच्याहि चरित्रांचा, कामगिरीचा व कालाचा अभ्यास होण्याला एक चांगला मुहूर्त उपलब्ध झाला आहे. पुष्कळांना अशा प्रकारचा खोल अभ्यास करावा अशी स्फूर्ति झाली आहे. त्या सर्वांना आपल्या अभ्यासाचें फलित इतरांच्या मार्गदर्शनासाठी प्रसिद्ध करतां आलें तर फार चांगलें होईल. टिळकांबद्दल स्थूल, अगदी स्थूल, अशी माहिती हिंदुस्तानभर आहे. ते मोठे देशभक्त होऊन गेले, त्यांच्यावर तीन वेळां तुरुंगांत बसण्याचा प्रसंग आला. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ही मोठी घोषणा त्यांनी केली इतपत माहिती सामान्यतः प्रत्येक भारतीयाला आहे किंवा असावी. सुदैवाने त्यांच्याबद्दल माहिती मिळविण्याला पुष्कळ वाङ्मय विशेषतः मराठींत उपलब्ध आहे.

इंग्रजींत व इतर देशी भाषांतहि थोडेंबहुत आहे. पण इंग्रजींत त्यांच्याविषयी जें कांही लिहिलें गेलेलें आहे त्यांत, त्यांच्याबद्दल गैरसमज व्हावा, त्यांच्या मतांचा विपर्यास व्हावा आणि त्यांचें अगदी विकृत स्वरूपच लोकांसमोर यावें असाच प्रकार जास्त आहे. विशेषतः इंग्रज व अँग्लोइंडियन लेखकांनी लिहिलेलीं जीं इंग्रजी पुस्तकें हातीं लागतात त्यांत त्यांना अतिशय अन्याय करण्यांत आलेला आहे. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांचीं हिंदुस्थानविषयक तीनहि पुस्तकें व सर स्टॅनले रीड, टाइम्स ऑफ इंडियाचे माजी संपादक यांचें एक पुस्तक हीं प्रस्तुत विधानाचा खरेपणा पडताळून पाहण्यासाठी कोणींहि वाचावीं.

या व असल्या लेखकांनी म्हटलें आहे तरी काय याची थोडीशी कल्पना येण्याकरिता त्यांजवर करण्यांत आलेल्या कांही आरोपांचा उल्लेख केला पाहिजे. ब्रिटिशांचे द्वेष्टे, हिंसामार्ग किंवा अत्याचार यांचे पुरस्कर्ते, मुसलमानांचे शत्रु, विध्वंसक उद्योगांचे प्रवर्तक, कलहप्रिय, एकांतिक, दुराग्रही वगैरे शब्द त्यांच्या वर्णनासाठी या लेखकांनी वारंवार वापरले आहेत. सामाजिक सुधारणेचे शत्रु, पुराणमतवादी व ब्राह्मणेतरांना पाण्यांत पाहणारे हेहि आरोप त्यांच्यावर अगदी निरर्गलपणें करण्यांत आलेले आहेत. हे आरोप करण्यांत त्यांचे कित्येक अदूरदृष्टि, असमंजस व पूर्वग्रहांनी दूषित झालेले देशबांधवहि सामील होते. टिळक व गांधी या विरोधी शक्ति व विसंवादी व्यक्ति होत्या असा एक समज जो फैलावलेला आहे तोहि अशापैकीच. अशा प्रकारच्या अज्ञानाने किंवा गैरमाहितीने प्रस्तुत लेखकाचें मनहि कांहीसें ग्रस्त झालेलें होतें हें कबूल करण्यास त्याला मुळीच शरम वाटत नाही. परंतु कॉंग्रेसने नेमलेल्या टिळक-शतसांवत्सरिक उत्सव-समितीने मागविलेल्या चरित्रांत आपलेंहि एक चरित्र सादर करण्याचा जो उद्योग प्रस्तुत लेखकाने केला, त्यामुळे त्याला मुळांत जाऊन अनेक आधार व अस्सल कागदपत्र अभ्यासावे लागले आणि त्याचे बरेच गैरसमज दुरुस्त झाले.

खुद्द टिळकांचें आणि इतरांनी लिहिलेलें टिळकांबद्दलचें बरेंच वाङ्मय नजरेखाली घालावें लागल्यामुळे, टिळक-गोखले, टिळक-आगरकर, टिळक-गांधी हा द्वंद्वविचार टाळण्यासारखा नव्हताच. पण तो विचार करावा लागला. यामुळे प्राप्त झालेलें मानसिक समाधान म्हणजे एक मोठाच मानसोन्नतिकारक अनुभव ठरला. या सर्व थोर व्यक्तिविशेषांचें थोरपण कांही विलक्षणपणें अनुभवाला आलें. तथापि हीं सर्व माणसेंच होतीं, पूर्णत्वाला पोचून ' नराचे नारायण ' न बनलेलीं माणसें होतीं; तथापि त्या रस्त्यावरचा बराच मोठा मुक्काम गाठलेलीं, सर्वांनी त्यांचा कित्ता घ्यावा आणि पुढे कदम टाकावें अशीं माणसें होतीं, हें मनावर फार चांगल्या तऱ्हेने ठसलें. हा अनुभव जमत जमत गेला. ही प्रक्रिया चालू असतां गडकरी यांच्या ' एकच प्याला ' नाटकांतील रामलालने एका वेळीं केलेला टिळक-आगरकरांचा उल्लेख पुनः पुनः आठवे. टिळक-आगरकरांचा विरोध म्हणजे आकाशांतील नक्षत्रांच्या शर्यती. त्यांच्या प्रकाशाने आपण आपला वागणुकीचा रस्ता चोखाळला पाहिजे अशा अर्थाचें कांही वचन गडकरी यांनी रामलालच्या तोंडीं घातलें आहे. नक्षत्रें तरी कोण होतात ? या पृथ्वीवर जीं माणसें आपल्या आयुष्याचा सदुपयोग करतात त्यांना खपुष्पांची योग्यता इहलोकचा वास संपल्यानंतर प्राप्त होते असलें कांहीतरी काव्यमय लेखन खांडेकरांनी केव्हा तरी कोठे तरी केलें आहे त्याची आठवण होई.

गंमतीची गोष्ट अशी की, गडकऱ्यांच्या देखील लक्षांत टिळकआगरकरांमधील विरोध तेवढा राहिला ! दोघांचें मतैक्य किती होतें हें राहिलें नाही. लोकांच्या लक्षांतहि ते एक-

मेकांशीं भांडले, त्यांनी एकमेकांवर खूप शाब्दिक प्रहार केले हेंच राहिलें. तें लक्षांत ठेवण्याला हरकत मुळाच नाही, किंबहुना अभ्यासकाने तिकडे दुर्लक्ष करावें असें देखील नव्हे; पण विरोधाचें क्षेत्र मोठें की ऐकमत्याचें मोठें याचा तारतम्यविचार पाहिजे. हा विचार करण्यासाठी खुद्द त्यांनी एकमेकांविषयी काय म्हटलें आहे हें पाहाणें फार उपयुक्त ठरतें. टिळकांनी लिहिलेला आगरकरांचा मृत्युलेख या दृष्टीने फार वाचनीय आहेच. पण त्यांच्या मृत्यूनंतर २१ वर्षांनी त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त टिळकांनी जो लेख लिहिला आहे तो आगरकरांचीं मतें काय होतीं याबद्दल खुलासा करणारा असल्यामुळे विशेष ध्यानांत घेण्याजोगा आहे. टिळकांनी लिहिलें, "आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणेंच देशांतील दारिद्य, परावलंबित्व, चांगल्या पुरुषांचा तेजोभंग, गोऱ्या अधिकारीवर्गाची चरणी व वरणी, व्यापारनाश वगैरे राजकीय व औद्योगिक अवनति पाहून त्यांचें चित्त, केशवपनादि चालींच्या निरीक्षणापेक्षाहि अधिक संतत व दुःखित होत असे. याला मिल्ल व स्पेन्सर यांनी प्रतिपादन केलेल्या स्वराज्याच्या तत्त्वांखेरीज दुसरा उपाय नाही अशी त्यांची पक्की खात्री होऊन चुकली होती. मिल्लने ज्याप्रमाणे आपली लेखणी केवळ स्त्रीस्वातंत्र्यावरच चालविली नाही तद्वतच आगरकरांची गोष्ट आहे; आणि जो तार्किकपणा सुधारणेसंबंधाने त्यांच्या अंगीं वसत होता तोच तार्किकपणा त्यांनी राजकीय बाबीवरील आपल्या लेखांतहि पूर्णपणें उपयोगांत आणला आहे. टिळक व आगरकर यांचा जो मतभेद झाला तो राजकीय बाबतींत नाही व शिक्षणाच्या बाबतींतहि नाही. मतभेद सामाजिक व धार्मिक बाबींत उत्पन्न झाला होता."

आता आगरकर स्वतः या मतभेदांबद्दल काय म्हणतात पाहा.—"धर्म, राज्य व समाज यासंबंधाने अलीकडे जे औपपत्तिक सिद्धान्त सर्वमान्य होऊन बसले आहेत त्यांविषयी आम्हां उभयतांत म्हणण्यासारखा मतभेद नाही. दोघांत जो मतभेद पडतो तो आजतारखेस ते सिद्धान्त अमलांत आणण्यासाठी काय करतां येईल व तें कोणत्या साधनाने करतां येईल यासंबंधाने पडतो." मनाचा असा निश्चय झालेला असल्यामुळेच एकदा टिळकासंबंधाने लिहितांना त्यांनी जुन्या मताच्या लोकांना बजावलें की, टिळक तुमचे पुढारी नाहीतच, कारण ज्या सामाजिक सुधारणा आम्हांला अभिप्रेत आहेत त्या टिळकांनाहि आहेतच, फक्त आम्ही त्या हल्लीच्या सरकारच्या कायद्यानेहि अमलांत आणण्यास हरकत नाही असें म्हणतों आणि टिळकांना त्या लोकांच्या लोकांनीच व लोकधुरीणांच्या मार्गदर्शकत्वाखाली व्हाव्या असें आग्रहाने वाटतें. "स्वभूमींत, स्वलोकांत, स्वधर्मांत व स्वाचारांत राहून अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छळास न भितां, त्यांच्याशीं कधी भांडून, कधी युक्तिवाद करून, कधी लाडीगोडी लावून, अथवा सामर्थ्य असल्यास कधी त्यांना दटावून त्यांची सुधारणा करणें, यांतच खरी देशभक्ति, खरी बंधुता, खरा देशाभिमान, खरें शहाणपण आणि खरा पुरुषार्थ आहे" हें आगरकरांचें मूलभूत विचारसूत्र ध्यानांत घेतलें म्हणजे टिळक व आगरकर यांच्यांत धोरणाचाहि फारसा फरक होता असें म्हणवत नाही. मग फरक होता कसला ? स्वभावाचा, प्रकृतीचा, किंबहुना कशाला महत्त्व द्यावें व कशाला देऊं नये याबद्दलची स्थलकालपरिस्थिति ठरविण्याचा आणि थोडें थिल्लरपणाने बोलायचें म्हटलें तर उभयतांच्या लहरीचा असेंच म्हणावें लागेल. गंभीरपणाने गीतावचनाचा आश्रय घेऊन बोलावयाचें तर 'सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि'.

आगरकर पक्के स्वराज्यवादी होते व केवळ समाजसुधारक म्हणून त्यांचा गौरव करणारांना सगळा आगरकर पचण्यासारखा नाही हें जें टिळकांनी त्यांच्या एकविसाव्या पुण्यतिथी-

संबंधाने लिहितांना म्हटलें तें स्वतःच्या खात्रीचें विधान तर असणारच, परंतु आगरकरांच्याच लेखनांत जर त्याला दुजोरा मिळाला तर दुधांत साखरच काय, पण केशरहि पडल्यासारखें होईल. असे उतारेहि दाखवितां येतात. " हिंदुस्तानच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत सर्वांनी जारीने चळवळ करण्यास सुरुवात करून आपला इच्छित हेतु ( राजकीय स्वातंत्र्य ) तडीस जाईपर्यंत अश्रांत ती चालू ठेवण्याचा निश्चय केला पाहिजे." " राजकीय हक्कांची, जड सुखाची किंवा स्वातंत्र्याची ' घाल ' म्हणून कोणी भीक घालीत नाही. " " उद्या आम्हांस सीझर, अलेक्झांडर, नेपोलियन किंवा ड्यूक ऑफ वेलिंग्टनसारखा पुढारी मिळेल तर इंग्रज लोकांना हिंदुस्तानचा कारभार पाहण्याची जी दगदग पडत आहे ती आम्ही दूर करूं; इतकेंच नाही तर नेल्सनसारखा तांडेल मिळेल तर ' अजिंक्य आरमारानिशी " इंग्लंडवर चाल करून जाऊन कोहिनुरासकट जी जी मौल्यवान् वस्तु इंग्रज लोकांनी इकडून तिकडे नेली आहे ती परत आणूं. तसेंच ग्लॅडस्टनसारखा पुढारी मिळाल्यास हाउस ऑफ लॉर्ड्स्ची पर्वा न करतां पांचपंचवीस वर्षांत इंडिया सेल्फ-गव्हर्नमेंट बिल हाऊस ऑफ कॉमन्समध्ये पास करून घेऊं. "

आगरकर स्वराज्यवादी होते याबद्दलची खात्री पटण्यास बानगीदाखल दिलेले हे उतारे वास्तविकपणें बस्स व्हावेत. परंतु ते केवळ स्वराज्यवादी नसून लोकशाही स्वराज्याचाच प्रचार टिळकांप्रमाणे त्यांनीहि केला हें दाखविणेंहि इष्ट आहे. " जे खरे लोकाग्रणी आहेत त्यांनी लोकांमध्ये देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चळवळ करतांना राजद्रोहाचा किंवा दुसरा कसलाहि आरोप आपणांवर आणून घेण्यास व त्याचे परिणाम सहन करण्यास तयार झालें पाहिजे. असें करतांना ' दुही माजवा आणि राज्य करा ' या धोरणाने चालणाऱ्या इंग्रजांचे दोष काढावेच लागतात; तथापि सरकारचे जे दोष दाखविण्यांत येतात ते त्यांच्या नजरेस येऊन दूर करावेत हा एक हेतु असतोच; पण मुख्य हेतु तो नाहीं. आमच्या राज्यकर्त्यांस त्यांचे दोष दाखवून किंवा त्यांच्यापुढे झोळी पसरून त्यांत एखादा तुकडा टाकण्याबद्दल त्यांची प्रार्थना करण्यापेक्षा, लोकांस आपल्या स्थितीचें खरें ज्ञान होईल व ती सुधारण्याविषयी उत्साह उत्पन्न होईल हा प्रधान हेतु असतो. " हा उतारा लक्षांत घेतला म्हणजे राजकीय चळवळीची गरज व ती कशी करावी याबद्दलचें टिळक-आगरकरांचें धोरण अगदी तंतोतंत एक होतें हें दिसून येतें. हा हेतु धरून पुढारी निश्चयाने वागूं लागले म्हणजे भारताच्या एकमुखी राष्ट्रीय घोषणेसाठी सुप्रतिष्ठित झालेल्या इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या हातून " इंग्लंडचें अनुकरण करणें इष्ट असेल तर तेथील हौस ऑफ कॉमन्ससारखी राज्यसभा येथे स्थापण्यांत येईतोपर्यंत कार्यभाग उरकला पाहिजे. अलीकडील राजकीय विचारपद्धतीमुळे कोणत्याहि राष्ट्राला राष्ट्रपण येणें म्हणजे त्यावर अंमल करणाऱ्या सरकारचें नियंत्रण किंवा नियमन लोकांच्या हातीं येणें होय."

लोकशाही स्वराज्याच्या पुरस्काराला आणखी काय शिंगें असतात ? विशेषतः आगरकरांची कारकीर्द म्हणजे सार्वजनिक जीवनाची मुदत ही फक्त १८८१ ते १८९५ इतकी सुमारें साडेचवदा वर्षांचीच होती हें ध्यानांत घेतलें म्हणजे त्यांच्याकडून आणखी स्पष्ट, सुश्लिष्ट व प्रमाणबद्ध अशा राजकीय अथवा कोणत्याहि विषयावरील विचारप्रणालीची काय अपेक्षा आपण करावी ? टिळकांना आगरकरांहून २५ वर्षें अधिक आयुष्य लाभलें म्हणून त्यांच्या सर्व कल्पना व त्या प्रकट करण्याची पद्धति अधिक रेखीव व निश्चित स्वरूपाची झाली इतकेंच काय तें. आर्थिक समतेचा अथवा समाजवादाचा मूलगामी विचारहि

आगरकरांच्या लिहिण्यांत कसा सहजपणें येऊन गेला आहे हें पाहण्यासारखें आहे. आगरकर म्हणतात, " सुखप्राप्तीचें साधन जें द्रव्य तें समाजांत एक तर सारखें वांटून गेलें पाहिजे, किंवा एकत्र असल्यास समाजाच्या सामायिक ताब्यांत असावें. " असो. आगरकरांचीं हीं मतें नीट ध्यानांत घेतलीं व टिळकहि समाज-सुधारणेच्या कार्यक्रमाचे खरोखर शत्रु नसून मित्रच होते हें पाहिलें म्हणजे पूर्वी त्यांचे कितीहि कलह झाले असले तरी ते मिटले असते आणि आगरकरांना आयुष्य जास्त लाभलें असतें तर त्यांचीं सर्वांगीण सुधारणेचीं कामें टिळकांच्या सहकार्याने आणि मदतीने चालू राहिलीं असतीं असें म्हणावेसें वाटतें.

आजचा सामाजिक समता प्रस्थापित करण्याचा कार्यक्रम, समाजवादाच्या तत्त्वावर समाजाची पुनर्घटना करण्याचा कॉंग्रेसप्रणीत कार्यक्रम, सत्याग्रहाच्या मार्गाने समाजवाद सायुध, सशक्तिक व ' सालंकृत ' करण्याचा कार्यक्रम त्यांना एकदम पसंत झाला असता याबद्दल मुळीच शंका नको. टिळकहि त्याच दिशेने गेले असते. टिळक–आगरकरांची परंपरा पुढे चालविणें म्हणजे स्वराज्याचें सुराज्य करणेंच होय. सुराज्य होणें म्हणजे भारताच्या घटनेंत तीं मूलतत्त्वें म्हणून सांगितलीं आहेत त्या सर्वांचा अंमल होणेंच होय. अन्न, वस्त्र, आसरा सर्व नागरिकांना मिळाला पाहिजे, सर्वांना रोजगार असला पाहिजे, शिक्षण सर्वांना मिळालें पाहिजे असें म्हटलें, म्हणजे स्त्रियांनाहि तें मिळालेंच पाहिजे हें निराळें सांगावयास नको. स्त्री-पुरुषांना समान हक्क पाहिजेत असें म्हटल्यावर विधवांना पुनर्लग्नें करतां येण्याची मोकळीक पाहिजे व विवाहविच्छेदहि करतां आला पाहिजे हें उघडच आहे. बालविवाह आता उरलेले न हीतच, किंबहुना विवाह फाजील प्रौढपणीं होत आहेत अशीच तक्रार आता स्त्रिया व पुरुष दोघांच्याहि बाबतींत उत्पन्न होत आहे. अस्पृश्यता कायद्याने गेलीच आहे, व्यवहारांतहि ती लौकरच नामशेष होईल. परदेशगमन आता कोणी निषिद्ध मानीत नाही व त्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याचा प्रश्नहि कोणी काढीत नाही. आगरकरांनी सांगितलेल्या या सगळ्या सुधारणा आता झाल्या. आता समाजवादी तत्त्वावर पुनर्घटना होऊं घातली असतां, आरोग्यरक्षणाची व औषधपाण्याची सार्वजनिक व्यवस्था होणें; बागबगीचे, विश्रामधामें, क्रीडा-सदनें यांची मुबलक व्यवस्था होणें, सुप्रजाजननाची व प्रजा-प्रतिबंधाची विश्वसनीय माहिती व साधनें विवाहितांस उपलब्ध होणें, माता व मुलें यांच्या संगोपनाची सरकारी व निमसरकारी व्यवस्था होणें, ज्यांची मिळकत कमी आहे अशा नागरिकांना अल्प किमतींत पौष्टिक अन्न मिळवून देणें अथवा तत्संबंधी माहिती फैलावणें, भिकारी व अनाथ-पंगु यांना रस्त्यावर भटकण्यास न लावतां त्यांना करतां येण्याजोगें काम देऊन त्यांचें जिणें मानाचें होईल अशी व्यवस्था करणें, अतिवृद्धांना सरकारी तनखा मिळणें आणि या व आणखी अशाच पुष्कळ गोष्टी घडून येण्यासाठी राज्यकारभार कार्यक्षम, लाचलुचपतीपासून मुक्त व कर्तव्यदक्ष बनविणें अशा सुधारणा झाल्या पाहिजेत. हें झालें म्हणजेच स्वराज्याचें सुराज्य झालें असें होईल आणि टिळक–आगरकरांचा ध्येयवाद सफल व संपूर्ण होईल. ● ● ●

अनुक्रमणिका

अरविंद मंगरूळकर

# संस्कृत साहित्यांतील शरद्-ऋतु

संवत्सरचक्राची सहा ऋतूंमध्ये केलेली समान विभागणी ही भारताच्या इतिहासामध्ये अतिशय प्राचीन आहे; निदान ब्राह्मणकालाइतकी तरी ती प्राचीन खासच आहे. कारण ब्राह्मणग्रंथांमध्ये तशा प्रकारचे स्पष्ट निर्देश आढळतात[1]. ही विभागणी प्राचीन मानवाला निसर्गाच्या दीर्घकालीन आणि सूक्ष्म अवलोकनामुळे सुचली असली पाहिजे, हें उघड आहे. हवेमध्ये होणारे अनुकूल-प्रतिकूल बदल, आकाशाचीं रम्य-भीषण दृश्यें, पाण्याचे उणे-अधिक पूर, वृक्षवल्लरींचीं रूक्ष-मनोहर अशीं बदलतीं स्वरूपें हीं पाहून मानवाला मोठाच हर्ष वाटला असला पाहिजे; आणि हीं दृश्यें ठरावीक काळाने पुनरावृत्त होतात, हें जेव्हा त्याला दिसलें तेव्हा त्याने सृष्टीमधील या बदलांचा त्या-त्या काळाशीं मेळ घातला आणि ऋतूंचें एक क्रमचक्र बसविलें. प्रथमच दिसलेली सुंदर लाल पालवी, प्रथमच अनुभविलेली पावसाची सुगंधित सर आणि प्रथमच दिसणारीं गळतीं पांढुरकीं पानें यांचे तीन विभाग[2] म्हणजे मानवाचें केवळ ढोबळ अवलोकन होय. त्यापुढे जाऊन त्याने जेव्हा या तीन कालविभागांचेहि सृष्टि-भेदानुसार आणखी तीन उपविभाग पाडले, तेव्हा त्याच्या सततच्या सूक्ष्म अवलोकनाची जागती साक्षच मिळाली. कारण हे पोटविभाग दोन मुख्य काळांची सांधेमोड करणारे आहेत. पूर्वीच्या ऋतूचीं रेंगाळतीं पावलें आणि आगामी ऋतूची अस्पष्ट चाहूल ही या संधिकालांत दिसून येते.

शरद्-ऋतु हा अशा संधिकालाचा एक ऋतु आहे. त्याचें बदलतें स्वरूप जसें सूक्ष्म आहे, तसेंच बहारीचेंहि आहे. वर्षाऋतूंत यथेच्छ सचैल स्नान केलेली सृष्टि आता उघडयावर केस सुकवीत बसलेली असते. तिचें अंग या वेळीं अगदी स्वच्छ, नितळ झालेलें असतें. तिचीं हिरवीं-पोपटी रेशमी वस्त्रें तकतकीत झालेलीं दिसतात. पावसाळ्याचा उद्दटपणा नाहीसा झालेला असतो, आणि हेमंतांत फुटावयाचीं अंगें अजून फुटलेलीं नसतात. धान्य पिकूं लागल्यामुळे पाखरांच्या भराऱ्या आकाशांत दिसूं लागतात, आणि गवताळ जमिनीवर गुरें जोगावतांना दिसतात. चिखलाने सारविलेलें आकाशाचें अंगण आता धुऊन निवालेलें असतें, आणि नद्यांतली राडहि खाली बसलेली असते. वर्षा-ऋतूनंतर येणारा शरद्-ऋतु हा शेतकऱ्याचा तर उत्सवच आहे; कारण त्याला सुगीचीं स्वप्नें पडूं लागतात आणि येत्या ' मार्गेसरांत ' पोरीबाळींचीं लग्नें करण्याची उभारी तो धरूं लागतो.

अशा या नवीन आशा-आकांक्षांची पालवी उत्पन्न करणाऱ्या शरद्-ऋतूचीं संस्कृत साहित्यांत पुष्कळ कवींनी वर्णनें केलीं आहेत. त्याचीं चित्रें रेखाटलीं आहेत. वाल्मीकि,

१. षड् वा ऋतवः संवत्सरस्य । शतपथब्राह्मण ११. ५. ४. १०.
२. त्रयो वा ऋतवः संवत्सरस्य । शतपथब्राह्मण ११. ५. ४. ११.



अनुक्रमणिका

कालिदास, भारवि, माघ, विशाखदत्त इत्यादि कितीतरी कवींना या ऋतूचा मोह पडला आहे आणि त्यांनी त्यावर फुलें उधळिलीं आहेत. वर्णनाच्या सूक्ष्मपणांत संस्कृत कवि सहसा कोणाला हार जावयाचे नाहीत. नवीन कल्पनाचित्रें सजविण्यांतहि त्यांचा हातखंडा आहे. परंतु वाल्मीकि आणि कालिदास हे दोन कवि वगळले तर सांकेतिकतेची कोंडी मात्र यांतल्या कोणालाच फोडतां आलेली नाही, आणि अलंकाराच्या आणि कल्पनेच्या आहारीं जाण्याची सवयहि टाळतां आलेली नाही. त्यामुळे कवीची निसर्गाशीं होणारी तन्मयता बिघडते, तोल ढळतो; एवढेंच नव्हे, तर मूळ विषयाचें अनुसंधानहि सुटतें, असें आपल्याला दिसून येईल. विशेष कारण नसतांना स्त्री-पुरुषांचींहि सूचक वर्णनें शरद्वर्णनांत येतात[1]. या वर्णनांत नवीन-नवीन कल्पना आपल्याला भेटतील, नवनवीन अलंकारहि दिसतील, पण नवे अनुभव मात्र आढळणार नाहीत. त्यामुळे त्यांत ठराविकतेचें पीक अमाप आलेलें दिसतें; आणि एखाद्या कवीची भाषा आडवळणी असली म्हणजे या कंटाळ्यांतच भाषिक खाचखळग्यांचीहि भर पडते. अशा दोषांमधून मुक्त असलेले कवि म्हणजे वाल्मीकि आणि कालिदास हेच. रामायणाच्या किष्किंधाकांडांमध्ये वाल्मीकीने शरद्-ऋतूचें जें तपशीलवार वर्णन केलेलें आहे तें सरलतेच्या, अवलोकनाच्या आणि तन्मयतेच्या दृष्टीने खरोखरच नमुनेदार आहे. त्यांतलें वाल्मीकीचें हें वर्णन-कौशल्य पहा :

" इंद्राने आजवर पाण्याचा उमाप वर्षाव करून धरित्रीला संतुष्ट केलें, आणि आता पिकेंहि तयार केलीं. डोंगरांच्या मालांकडे आणि वृक्षांच्या रायांकडे आजवर धाव घेणारे मेघ आता थकूनभागून गेले आहेत. कुडयाच्या आणि अर्जुनाच्या फुलांच्या वासाने भरलेले आर्द्र वारेहि आता वहावयाचे थांबले आहेत. मेघांचा गडगडाट, हत्तींचा चीत्कार, मोरांच्या केका, ओढ्यांचा खळखळाट आता पार बंद पडला आहे. महामेघांनी स्नान घालून स्वच्छ केलेले डोंगर आता चांदण्यामध्ये अंगाला चंदनाचें उटणें लावल्याप्रमाणे दिसताहेत. अशा रीतीने शरद्-ऋतूची लक्ष्मी ही सातविर्णीच्या वृक्षांच्या ठायीं, चंद्र-तारा-रालींच्या ठिकाणीं आणि डुंबणाऱ्या हत्तींच्या ठिकाणीं आता प्रकट झाली आहे. गायी-बैलांचीं खिल्लारें आता यथेच्छ जोगावताहेत आणि नद्यांचे प्रवाहहि निवळले आहेत. आकाश निर्मेघ झालें आहे, आणि आता त्याचा रंग नवीन पाजळविलेल्या शस्त्राच्या धारदार पात्याप्रमाणे दिसत आहे. उन्हें तावून जमिनीवरचा चिखल सुकून गेला आहे; एवढेंच नव्हे, तर बऱ्याच दिवसांनी आता धूळ जमूं लागली आहे. स्वाभाविकच, राजेलोक आता स्वाऱ्यांच्या तयारीला लागले आहेत. जणू कांही त्यांचींच प्रतीकें असलेले माजलेले बैल आपल्या अंगावर धूळ उधळून घेऊन जोरजोराने डुरकाळ्या फोडीत इतर बैलांना आव्हान देताहेत. तर इकडे सारसांचे थवे पिसारे गळून गेलेल्या मोरांची हेटाळणी करीत आहेत, आणि त्यामुळे ते बिचारे खट्टू होऊन गेले आहेत. प्रवाहाचा पावसाळ्यांतला ओढाळपणा नाहीसा झाल्यामुळे हत्ती मनसोक्त डुंबत, पाणकोंबड्यांना भिववून सोडीत, सोंडेमधून पाण्याचे फवारे उडवीत आहेत; आणि मधून-मधून पाणी पिताहेत. नद्यांच्या कांठचा चिखल वाळून गेला आहे. त्यांचीं वाळवंटें उघडीं पडलीं आहेत. पाणी निर्मळ झालें आहे. गायींचीं खिल्लारें भोवताली चरत आहेत. सारसांच्या आवाजांनी वाळवंट दुमदुमून गेलें आहे, आणि मानससरोवराहून आलेले हंस आता डौलाने

१. पहा — किरात. ४–१७; ४-२८. शिशुपाल. ६-४८; रामा. किष्किंधा. ३०-२८.
२. सर्ग ३०.

नद्यांत उतरत आहेत. बेडकांचे ' डराव-डराव ' आवाजहि बंद झाले आहेत. पात्रक्षाऱ्यांत कोठे नाहीतसे झालेले नानारंगांचे रोडावलेले साप बिळांतून बाहेर पडून भक्ष्य शोधीत सळसळत आहेत. तर तिकडे आकाशांत सारसांच्या वेड्यावाकड्या हारी पिकलेल्या साळींचे लोंगर खाऊन मजेने उडत आहेत. डोहांतल्या प्रशांत पाण्यांत जो एकच एक हंस चोच मागे खुपसून झोपला आहे तो आकाशांतल्या चंद्रासारखा शोभतो आहे. पहाटच्या वेळीं कोणी गुराखी पावा वाजवितो आणि त्यांतच गुरांचे हुंबारवहि मिसळतात. नदीकांठचीं काश-तृणें मंद झुळुकींनी डोलताहेत. रात्र ही तर एखाद्या नटमोगरीसारखी शोभत आहे. तिचें तें प्रसन्न चंद्रमुख, तारानेत्र आणि चांदण्याचें रेशमी वस्त्र यांमुळे रात्रीचें वैभव विलक्षण वाढलें आहे..... "

किती सरळ आणि रसाळ आहे हें दृश्य ! शरद्-ऋतूंतल्या सर्वव्यापी तृप्तीचा किती पोटभर अनुभव यांत आहे ! अलंकार पहाल, तर सांपडतील थोडेसे[1], पण बटबटीत नाहीत. पक्वान्नांतल्या मनुकांप्रमाणे मूळ चित्रांत ते कसे बेमालूम सामावून जातात. ते बिलकूल खुपत नाहीत. कल्पनेवर अतिरिक्त भरहि दिसणार नाही. तिच्या भराऱ्या नाहीत, की छायाचित्राप्रमाणे नुसताच तपशील भरला आहे, असेंहि नाही. त्यावर काव्यरसाचें शिंपण आहे. मात्र त्यांत उग्र अत्तराचा दर्प नाही. याचमुळे सौम्य रंगाच्या एखाद्या भित्तिचित्राप्रमाणे आदिकवीचें हें वर्णन चित्तांत ठसतें, आणि एकदा ठसल्यावर चित्त त्यावर कायमचें लोभावतें.

वाल्मीकीने शरद्-ऋतूचें जें हें वर्णन केलेलें आहे त्याचाच आदर्श उत्तरकालीन कवींनी आपल्यापुढे ठेविलेला आहे. फक्त कृत्रिम काव्यात्मता आणि नवीन अलंकार तेवढे त्यांचे स्वतःचे. वानगी म्हणून भारवीच्या 'किरातार्जुनीया'मधील हें अर्जुनाने अनुभविलेल्या शरद्-ऋतूचें वर्णन पहा :

" आपले कमलनयन उघडून पाणी जेव्हा मासोळ्यांच्या उड्या पाहूं लागलें तेव्हा मासोळ्यांचे ते विलास अर्जुनाला आपल्या प्रियेच्या नेत्रविलासांप्रमाणे वाटले आणि अर्जुनाचें चित्त त्यांच्याकडे वेधिलें गेलें. कमळांनी खचलेल्या पाण्यांत आलेले साळींचे लोंगर पाहतां पाहतां अर्जुनाला अत्यंत हर्ष झाला. 'समसमां संयोगा'चा कोणाला आनंद होत नाही ? साळीची राखण करणाऱ्या स्त्रियांनी आपल्या भुवयांच्या मधोमध दुपारीच्या फुलाची एक लाल-भगवी पाकळी ठेवून दिली होती आणि तीमुळे अधरोष्ठाच्या लालीचा तोल संभाळला गेला होता. एका बैलाला झुंजींत पळवून लावून दुसरा एक बैल नदीच्या दरडीला टकरा देत डुरकत होता, तेव्हा तो बलदंड बैल जणूं कांही शरद्-ऋतूचा मूर्तिमंत दर्पच भासला. साळी आता पिकल्या आहेत. नद्या स्थिरावल्या आहेत. जमिनीवरचा चिखल सुकला आहे, आणि त्यामुळे पावसाळ्याचें सगळें जुनें प्रेम या नवीन गुणांमुळे व्यर्थ झालें. आकाशांतल्या बगळ्या नाहीतशा झाल्या आहेत. इंद्रधनुष्यें लोपलीं, तरी आकाश पराकाष्ठेचें सुंदर दिसत आहे. साहजिकच आहे की, स्वभावसुंदर वस्तूला बाह्य गुणाची काय अपेक्षा[2] ? पाऊसकाळ हा दिग्वधूंचा पति. पण तो आता दूरदेशीं निघून गेल्यामुळे त्यांनी आपल्या गळ्यांतल्या विजांच्या सोनसाखळ्या काढून ठेविल्या; दिशा आता रोडदेखील झाल्या. पण त्यांची कृशतासुद्धा

---

१. पहा — रात्रिः शशाङ्कोदितसौम्यवक्त्रा,......नारीव शुक्लांशुकसंवृताङ्गी ।
रामा. किष्किंधा. ३०-४७.

२....न रम्यमाहार्यमपेक्षते गुणम् । किरात. ४-२३.

सुंदरच दिसत आहे[१]. लोंगर आलेल्या या पिवळ्या साळी आपल्या तळाशीं असलेल्या कमळांचा जणू वास घेण्यासाठी की काय, खाली लवत आहेत. अरण्यसुंदरीला फुलांच्या रूपाने जणू हसूं फुटलें आहे. मेघांची अडचण नाहीशी झाल्यामुळे अष्टदिशा आता एकमेकींशीं हंस-कूजनाच्या मिषाने गुजगोष्टी करीत आहेत[२]. शालिगोपींचीं उंच स्वरांतलीं गोड गाणीं ऐकतां-ऐकतां हरिणी पुढच्या गवताला तोंड लावावयाचेंदेखील विसरून गेल्या आहेत[३]. पोवळ्याच्या तुकड्यासारखी लालचुटुक चोच, तींत धरलेले साळींचे पिवळे लोंगर आणि शिरीषाच्या फुलांप्रमाणे हिरवेंकंच शरीर, यांमुळे उडत्या पोपटांच्या शाळा ह्या इंद्रधनुष्यांसारख्या दिसत आहेत[४]........ "

वाल्मीकीचें शरदाचें वर्णन आणि भारवीचें त्याच ऋतूचें वर्णन यांत सरस-निरस ठरविण्याची विशेष यातायात करण्याची आवश्यकता नाही. भारवीच्या वर्णनांत घडीवपणा जास्त असेल, पण त्याचा कृत्रिम आविष्कार अगदी उघड आहे. किंबहुना, कवि निसर्गाचें दृश्य अनुभवीत नसून आपल्याच कल्पनावैभवांत आणि भाषेच्या मोडणींत मशगुल आहे, असेंहि वाटल्यावाचून राहत नाही. अर्थान्तरन्यासासारखा अलंकार आधी जमवून ठेवून नंतर त्याचें समर्थक वर्णन लिहिलें, असेंहि वाटतें[५]. त्यामुळे 'ना वर्णन, ना अलंकार' अशी स्थिति झालेली दिसेल. शिवाय मूळ कथावस्तूमध्ये हें वर्णन सामावून जात नाही, हाहि आक्षेप आहेच. सुटीं वर्णनें प्रथम लिहून ठेवून मग तीं काव्यांत पेरून देण्याची युक्ति कवीनें केली असल्यास न कळे !

लहान खरें, पण यापेक्षा विशाखदत्ताने 'मुद्राराक्षस' या नाटकांत केलेलें शरद्-ऋतूचें वर्णन[६] कितीतरी बरें आहे. अर्थात् त्यांतहि शरद्-ऋतूंतील ठरावीक दृश्यांचाच निर्देश आहे. परंतु त्यांत कल्पनेची किंवा अलंकाराची जबरी नाही. पावसाळ्यानंतर व्यक्त होणाऱ्या दीर्घ दशदिशांची कवीने त्यांत आकाशांतून वाहणाऱ्या नद्यांशीं भव्य तुलना केलेली आहे.[७] दिग्रूपी नद्यांचीं शुभ्र मेघरूप वाळवंटें आता आक्रसून गेलेलीं आहेत. उडणाऱ्या सारसांच्या कूजनांनी वातावरण गजबजून गेलेलें आहे. आणि रात्रीच्या वेळीं तारारूप कुमुदांनी दिशा भरून गेल्या आहेत. शरद्-ऋतूने निसर्गाला जणू विनयाचे पाठ दिले आहेत. मर्यादा सोडणाऱ्या प्रवाहांना वहाळाच्या पात्रांत आणून सोडिलें आहे. साळींना श्रीमंतींत नम्र होण्याचे घडे दिले आहेत, आणि मोरांचा मदहि त्याने झाडून टाकिला आहे. गंगा नदी तर पावसाळ्यांत आपल्या नवऱ्यावर, म्हणजे समुद्रावर, भारीच रुसली होती. कारण त्याच्या बहुपत्नीत्वाला त्या वेळीं मर्यादाच राहिली नव्हती. त्यामुळे पुढे ती बिचारी रोडावूनदेखील गेली. सरते-शेवटीं शरदाने एखाद्या चतुर दूतीप्रमाणे तिचें मन निवळविलें आणि तिची आणि तिच्या नवऱ्याची समजूत घालून त्यांचें मीलन घडवून आणिलें[८]

१....न दिग्वधूनां कृशता न राजते । किरात. ४–२४.

२....प्रकुर्वते वारिदरोधनिर्गताः परस्परालापमिवामला दिशः । किरात. ४–३०.

३. किरात. ४–३३.

४. शुकावलिर्व्यक्तशिरीषकोमला धनुःश्रियं गोत्रभिदोऽनुगच्छति । किरात. ४–३६.

५. किरात. ४–२३.

६. मुद्राराक्षस ३–७, ८, ९.

७. नभस्तः स्यन्दन्ते सरित इव दीर्घा दश दिशः । मुद्रा. ३–७.

८. सर्वात्मना रतिकथाचतुरेव दूती गङ्गां शरन्नयति सिन्धुपतिं प्रसन्नाम् । मुद्रा. ३-९.

नाटकांतल्या वातावरणाच्या दृष्टीने हें प्रसन्न वर्णन फार अनुकूल आहे हें तर खरेंच, पण त्यांतली सफाईहि विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. परंतु या सर्वांत कलात्मक मांडणीच्या आणि अभिनवतेच्या दृष्टीने पाहिलें तर कालिदासाने केलेल्या वर्णनाला संस्कृत साहित्यांत तोड नाही. या वर्णनांत त्याने कधी दाट गडद रंग वापरले आहेत, तर कधी पातळ रंगांचे हलके कुंचले फिरविले आहेत. कधी सुटीं चित्रें रेखाटलीं आहेत, तर कधी तीं कथावस्तूंत एकजीवपणाने विणून टाकिलीं आहेत. कधी वास्तव दृष्टिकोणांतलीं चित्रें उभीं केलीं आहेत, तर कधी तीं कल्पनेच्या हलक्या पंखांवर एखाद्या उडत्या म्हातारीप्रमाणे अलगद सोडून दिलीं आहेत. कालिदासाच्या 'ऋतुसंहारां'त शरदाचा एकरस अनुभव प्रत्ययाला येतो[1]

" काशाच्या फुलांचें शुभ्र वस्त्र नेसून आणि हंसकूजितांचे नूपुर घालून पक्क साळींची अवनत अंगयष्टि असलेला शरद्-ऋतु आता एखाद्या नववधूप्रमाणे आला आहे.[2] चंद्राचें चांदणें, रात्रकमळें, सातविणी आणि मालती यांमुळे वनप्रदेश कसे धवळून गेले आहेत. मासोळ्यांचे कमरपट्टे ल्यालेल्या आणि पक्ष्यांचे हार घातलेल्या विस्तीर्ण वाळवंटाच्या नद्या आता प्रमदांप्रमाणे मंदमंद वाहताहेत. शंखांच्या तुकड्यांप्रमाणे भासणाऱ्या पांढऱ्या मेघांच्या चवऱ्या आकाशावर ढाळल्या जात आहेत. आकाश गडद निळें झालें आहे. भूमि दुपारीच्या फुलांनी लाल होऊन गेलेली आहे. कांचनवृक्ष फुलांच्या घोसांनी लहडून गेले आहेत, आणि साळींचीं पिकें तर जिकडेतिकडे दिसूं लागलीं आहेत. नक्षत्रांचे अलंकार ल्यालेली आणि चांदण्यांचें रेशमी वस्त्र नेसलेली रात्र एखाद्या बालिकेप्रमाणे मोठी-मोठी होत आहे, पण पतिवियोग झालेल्या स्त्रियांना मात्र हीच रात्र दुःखदायक होत आहे. साळींना डोल देणारे, पुष्पित वृक्षांना नाचविणारे आणि कमळवेलींना हलविणारे मंद वारे प्रभातकाळीं सरोवरें तरंगित करून सोडताहेत. सारें वातावरणच पालटलें आहे. इंद्रधनुष्यें मेघांबरोबरच लोपलीं. ...ाच्या पताका असलेल्या विजा फडकत नाहीत, आणि बगळ्यांच्या रांगाहि दिसत नाहीत. स्त्रियांची गति आता हंसांनी उचलली. मुखशोभा कमळांनी घेतली. नेत्रकान्ति नीलकमलांनी आत्मसात् केली आणि भ्रूविलास नद्यांच्या तरंगांनी चोरिले..."

हें झालें सुटें वर्णन. पण 'रघुवंशा'च्या चौथ्या सर्गात त्यानें केलेलें प्रतापी रघूच्या सेवेला आलेल्या शरल्लक्ष्मीचें ठसठशीत वर्णन, आणि तेराव्या सर्गातील त्याच ऋतूची ऐकविलेली अत्यंत सूक्ष्म पावलट हीं पराकाष्ठेचीं मनोहर आहेत. सतारीच्या मुख्य तारांखाली सूक्ष्मपणाने अनुरणनाचा जवाब देणाऱ्या तरफांप्रमाणे हीं वर्णनें अत्यंत वेधक झालेलीं आहेत. 'शरद्' या स्त्रीलिंगी शब्दाचा कालिदासाने रघुवर्णनांत मोठा गोड उपयोग करून घेतला आहे. रघूचा आणि शरदांतल्या सूर्याचा 'प्रताप' ( म्हणजे पराक्रम आणि प्रकाश ) एकाच वेळीं जिकडे-तिकडे पसरला. इंद्राने आपलें धनुष्य खाली ठेवतांच आता रघूने आपलें धनुष्य उचललें. अगस्त्याचा आकाशांत उदय झाला; त्यसरशी पाणी शांत आणि निर्मळ झालें; पण रघूचे शत्रु मात्र स्वारीच्या भीतीने गडबडून गेले. शरदाने रघुवर कमळाचें छत्र धरिलें आणि 'काश'-फुलांच्या चवऱ्या ढाळल्या. रघु आणि चंद्र हे दोघे आता सारखेच 'प्रसन्न' दिसं लागले, आणि रघूचें आणि शरदाचें वैभव हंस, चांदण्या आणि पाणी यांत सारखेंच

१. ऋतुसंहार ३.
२. 'शरद्' हा शब्द संस्कृतांत स्त्रीलिंगी आहे.

विखरून गेलें. साळींची राखण करणाऱ्या स्त्रिया काम करतां-करतां उंच स्वरांत रघूचे पवाडे गाऊं लागल्या. माजलेले बैल नद्यांच्या दरडींना टकरा घेऊं लागले. सप्तपर्णी आणि रघूचे हत्ती एकाच वेळीं मद गाळूं लागले. रस्ते सुकले. आणि शरद्-ऋतूने राजाला त्यामुळे दिग्विजयासाठी निघण्याची प्रेरणा केली. इतकें झाल्यावर घोड्यांची आरती करतांना रघूने जो होम केला त्या वेळीं अग्नीनेहि उजवीकडे वळून आपल्या ज्वालाहस्तांनी त्याला विजयाचा आशीर्वाद दिला.

दुपेडी गोफाप्रमाणे कालिदासाने गुंफिलेलें हें वर्णन किती रेखीव आणि अव्याजमनोहर आहे! रघूची राजलक्ष्मी, शरदाची ऋतुश्री आणि कालिदासाची सरस्वती यांचा त्यात अत्यंत मिष्ट संगम झालेला आहे. शिवाय त्यांतलीं शब्दार्थांचीं विस्तारिलेलीं वलयें वेगळींच. गाऊं लागलेली भाषा आणि रंगविणारी शैलीहि वेगळीच; आणि शब्दांच्या लोलकांमधून दिसणारे अर्थांचे तरल मोहक प्रकाशरंगहि वेगळेच. आणि या सर्वांतून प्रतीत होणारें कवीचें बहुरंगी व्यक्तित्व, त्याचा दमदार आशय आणि त्याने निर्माण केलेली सुतोल रचना यांचें रसायनहि तसेंच अजोड. 'रघू'च्या तेराव्या सर्गांत शरदृतूचें जें वर्णन आलें आहे तें गुलाबजलाच्या फवाऱ्यासारखें अभावित टवटवी आणणारें आहे. त्यांत केवड्याचे सुवासिक पराग, घडांनी वाकलेल्या पोफळी, क्वचितच प्रकट होणारा एखादा मेघ आणि त्याची प्रिया विद्युल्लता, सारसांच्या हारी, दुपारचा उग्र सूर्य, पर्वताच्या शिखरालाच काय तो चिकटलेला मेघांचा चिखल, प्रसन्न प्रवाहांच्या नद्या अशा शरदृतूच्या बारीक खुणा आपल्याला दिसतात. रामचंद्र आणि सीता यांच्या रहस्यालापाला या ऋतूचें वातावरण तेथे फार अनुकूल झालें आहे. मात्र 'रघू'च्या चौथ्या सर्गांतलें शरदृतूचें ठसठशीत वर्णन आणि तेराव्या सर्गांतलें सूक्ष्म, तरल आणि फिरत्या रंगांचें वर्णन हीं अगदी वेगळ्या थाटाचीं आहेत. पहिलें जितकें घवघवीत, तितकेंच दुसरें हलक्या रंगांचें. पहिलें प्रतापी पार्श्वभूमि देणारें, तर दुसरें प्रेममय तोरण बांधणारें. पहिलें झळकत्या तलवारीसारखें, तर दुसरें उगवत्या इंद्रधनुष्यासारखें. ● ● ●

---

लेखांतील वर्णनें त्या-त्या मुळांचे संक्षिप्त अनुवाद आहेत.

आकाशवाणीच्या पुणें-केंद्राहून झालेल्या भाषणाचा थोडा विस्तारून वाढविलेला लेख.

साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास

# नागपूरच्या भोसले राजघराण्याची शारदोपासना

नागपूरचें भोसले राजघराणें हें मराठेशाहींत आपल्या पराक्रमाने व राजनीतिज्ञतेने कांही काळ चांगलेंच तळपलेलें आहे. त्यांचीं देदीप्यमान कृत्यें मुख्यत: बंगालसारख्या सुदूरच्या प्रांतांत घडल्यामुळे व कांहीहि झालें तरी मध्यवर्ती सत्तेच्या तें अंकित असल्यामुळे, त्यांच्या पराक्रमाला महाराष्ट्रीय परिसरांत विशेष उठाव मिळाला नव्हता.

पण अलीकडे रेसिडेन्सी रेकॉर्ड्‌सचें संशोधन होऊन बरेच महत्त्वाचे कागदपत्र प्रकाशांत आल्यामुळे व 'भोसल्यांच्या बंगालवरील स्वाऱ्या' या पुस्तकाच्या लेखकांसारख्या साक्षेपी लोकांनी अनेक यावनी लेख प्रकाशांत आणून बरीच नवी माहिती संकलित केल्यामुळे, त्यांच्या कर्तृत्वाची कल्पना येऊं लागली आहे. नागपूरचे राजे भोसले यांना मोतीवाले भोसले असें म्हणत असत, तें त्यांच्या बंगालच्या स्वारींतील पराक्रमामुळेच मुख्यतः होय. आजहि जुन्या बंगाली कवितांतून व म्हणींतून मराठ्यांविषयीची जी कडवट व भयाची भावना प्रत्ययास येते ती नागपूरच्या रघोजी भोसल्यांचे विख्यात सेनानी भास्कर राम कोल्हटकर व रघोजी भोसले यांच्या विक्रमांनीच निर्माण झालेली आहे. वस्तुतः भोसल्यांनी आक्रमण केलें होतें तें बंगाली जनतेवर नसून, बंगालचा सुभेदार अलिवर्दीखान याच्यावर होतें. पण दुर्दैवाने अत्याचारी अलिवर्दीखानाला कांहीच न म्हणतां बंगाली साहित्यिकांनी नागपूरकर भोसल्यांचा दंश धरावा हा एक राष्ट्रीय दृष्टीच्या अभावाचा तत्कालीन आविष्कारच म्हणतां येईल. असो; या विक्रमशाली भोसले राजघराण्यांत पहिल्या रघोजीपासून तर इंग्रजांविरुद्ध, त्यांच्या बंदिवासांतून युक्तीने स्वतःची सुटका करून घेऊन, स्वातंत्र्ययुद्धाचा प्रयत्न करणाऱ्या अप्पासाहेब भोसल्यापर्यंत अनेक कर्तृत्वशाली पराक्रमी पुरुष झाले आहेत. खड्गाच्या टोकाने विश्वाच्या रंगपटावर रक्ताच्या शाईने त्यांनी आपले विक्रमलेख लिहिले; पण विशेष आश्चर्याची व आभिमानाची गोष्ट ही आहे की, एका बाजूला शारदोपासकांना आपल्या कर्तृत्वाचे विषय पुरवीत असतांनाच या राजघराण्याने स्वतःहि प्रत्यक्ष शारदोपासना केलेली आहे. शारदोपासना म्हटली की,—तीहि राजघराण्याची शारदोपासना म्हटली की,—ती द्विविध असते. तिचा पहिला व सर्वमान्य प्रकार म्हणजे पंडितांना व भिन्नभिन्न क्षेत्रांतील शारदोपासकांना आश्रय देऊन, त्यांच्याद्वारे विद्यासंरक्षण व कलासंरक्षण करणें व तिचा दुसरा प्रकार म्हणजे स्वतः प्रत्यक्ष साहित्यनिर्मिति करणें. बहुधा राजघराण्यांच्या संबंधांत पहिला प्रकारच दिसून येतो. इराणापर्यंतचे देश पादाक्रांत करणारा महान् पराक्रम अंगीं असूनहि उत्कृष्ट काव्यनिर्मिति करणारा विणावादक समुद्रगुप्त क्वचितच आढळावयाचा. नागपूरचें भोसले राजघराणें या दोन्ही अंगांनी शारदोपासक होते, ही गोष्ट सर्वच महाराष्ट्राला अभिमानास्पद ठरणारी आहे. त्यांच्या या द्विविध शारदोपासनेचा प्रस्तुत लेखांत परिचय करून द्यावयाचा आहे.

### पांडित्याची आवड

भोसले राजघराण्याच्या पूर्वी नागपूर प्रांतांत गोंड राजांचें राज्य असे. पुढे हे गोंड राजे मुसलमान झाले व या राजघराण्यांतील हल्लीच्या पिढीने पुन्हा हिंदुधर्माचा स्वीकार केला आहे. गोंड राजांच्या राजवटींत नागपूर प्रांताचा विद्वत्तेशीं कांहीं संबंध असेल असें सिद्ध करण्यासारखा ऐतिहासिक पुरावा उपलब्ध नाही. पुढे रघोजी भोसले यांच्या पराक्रमाने भोसले राजघराणें राजे म्हणून या प्रांतांत सुस्थिर झाल्यानंतर, राजाश्रयामुळे या गोंडवनांतहि शास्त्रपाठाचे गंभीरध्वनि व कलादेवीच्या चरणनूपुरांचा झणत्कार ऐकूं येऊं लागला. ऐतिहासिक दृष्ट्या नागपूरच्या पांडित्याची परंपरा दीडशे वर्षांहून अधिक प्राचीन नाही. पण क्षणमात्र तळपणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे या नगरीच्या या अवधींतील पांडित्याने व साहित्यसेवेने भारतांतील पंडितांचीं मनें आकर्षित करून घेतलीं होतीं. काशीच्या गाजलेल्या विद्यापीठालाहि नागपूरच्या पंडितांचें आकर्षण असे. पांडित्याचा हा जो प्रकर्ष अल्पावधींत नागपूरच्या राजनगरींत दिसून आला याचें खरें कारण भोसले राजघराण्याची विद्याप्रियता व बाहेरच्या विद्वानांना येथे बोलावून आणून स्थिरपद करण्याची व शारदोपासनेला मुक्तहस्ताने साह्य करण्याची उदारप्रवृत्ति हेंच होय. कै. म. म. कृष्णशास्त्री घुले यांच्यामुळे महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेरहि विख्यात असलेल्या घुले घराण्याचें नागपूरला जें आगमन झालें तें भोसले राजघराण्याच्या खास निमंत्रणावरूनच होय. इ. स. १८१६ च्या सुमारास घुले घराण्याचे विख्यात वैयाकरणकेसरी सदाशिवभट्ट घुले हे भोसलेराजांच्या खास निमंत्रणावरून नागपूरला आले व येथेच स्थिरपद झाले.

### प्रा. अभ्यंकरांची चुकीची माहिती

या घुले घराण्याच्या नागपुरांतील आगमनासंबंधाने म. म. कै. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांचे चिरंजीव म. म. काशिनाथ वासुदेव अभ्यंकर यांनी पातंजल महाभाष्यानुवादाच्या डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या वतीने प्रसिद्ध झालेल्या प्रस्तावना-खंडासारख्या मोलाच्या पुस्तकांत अतिशय चुकीची माहिती दिलेली आहे. एक तर पुणें येथील पंडितांचे बहिर्देशीं गमन या शीर्षकाखाली ही माहिती देण्यांत आली आहे. वस्तुतः पुण्याच्या पंडितांच्या बहिर्देशीं गमनाचा घुले घराण्याच्या नागपूरला येण्याशीं कांही संबंध नाही. कारण घुले घराणें हें पुण्याहून नागपूरला आलेलें नसून काशीहून नागपूरला आलेलें आहे. तसेच श्री. अभ्यंकर यांनी सदाशिवभट्ट घुले यांचा निर्देश करतांना ते म. म. कृष्णशास्त्री घुले यांचे वडील होते असें सांगितलें आहे. वस्तुतः ते कृष्णशास्त्र्यांचे वडील नसून त्यांचे पणजोबा होते. वैयाकरण म्हणून प्रो. अभ्यंकरांनी त्यांचा निर्देश केला आहे; पण ज्यासाठी त्यांना भट्ट म्हणत असत त्या त्यांच्या संस्कृत व्याकरणांतील नव-संप्रदायांतील कामगिरीचा व ग्रंथांचा त्यांनी नुसता निर्देशहि केला नाही. सदाशिवभट्ट घुले हे इ. स. १८१६ च्या सुमारास नागपूरचे राजे मुधोजी ऊर्फ विख्यात अप्पासाहेब भोसले यांच्या खास निमंत्रणावरून नागपूरला आले होते. त्यांच्यापासूनच नागपूरला पांडित्य सुरू झालें असें म्हणतात, पण तें खरें नाही. भोसले राजघराण्याची शारदोपासकांना आश्रय देण्याची व त्याद्वारे विद्येची उपासना करण्याची परंपरा याहून अधिक जुनी आहे हें सदाशिवभट्टांना आणावयासाठी जें कारण झालें त्यावरून दिसून येतें. नीरजोल्लास नांवाच्या इ. स. १८८२ सालीं नागपूरला निघत असलेल्या मासिकांत पं. सदाशिवशास्त्री घुले यांचें जें चरित्र प्रसिद्ध झालेलें आहे, त्यावरून ही परंपरा अधिक

प्राचीन असल्याचेंच सिद्ध होतें. नीरजोल्लासांतील या घटनेशीं संबद्ध आहे असा परिच्छेद पुढीलप्रमाणे आहे. " येथील राजघराण्यांत माजलेली दुही यांच्या आगमनाचें कारण होय. नागपूरचे राजे बापूसाहेब ( दुसरे रघोजी इ. स. १७७३–१८१६ ) व त्यांचे पुतणे अप्पासाहेब ( मुधोजी भोसले इ. स. १८१७–१८ ) या दोघांत स्पर्धा चालली होती. विषतरूपासून जशी अमृतफलप्राप्ति व्हावी त्याप्रमाणे ह्या वेळेस अशा स्पर्धेचें अनन्वित फळ मिळालें. बापूसाहेबांनी व अप्पासाहेबांनी आपापल्या पक्षाचे चन्द्रपूरकर वीर राघवाचार्य व कृष्णशास्त्री रामानुज असे दोन पंडित ठेविले होते. त्यांच्या तोडीचे दुसरे पंडित त्या वेळीं नागपुरांत कोणी नसल्यामुळे त्यांची खरी किंमत समजेना. बापूसाहेबाला आपला पंडित श्रेष्ठ व अप्पासाहेबाला आपला पंडित श्रेष्ठ असें वाटत असे. म्हणून कोणाचा पंडित श्रेष्ठ ह्याचा निकाल करण्याकरिता काशींतून एक महापंडित बोलविण्याचें ठरलें. तदनुसार काशीला पत्र लिहिल्यावरून सर्व पंडितांनी मिळून सदाशिवशास्त्र्याला पाठविलें. ते येथे आल्यानंतर राजाने सभा भरविली. तींत या दोन पंडितांचा वाद एकसारखा एकवीस दिवसपर्यंत चालला होता. पण दोघांपैकी कोणाकडेहि अपजयाचीं चिन्हें दिसलीं नाहींत; तेव्हा घुलेशास्त्री यांनी असें सांगितलें की, दोघेहि बरोबरीचे महापंडित आहेत. यांचा वाद लवकर मिटणें कठीण. यावरून सभाविसर्जन होऊन राजाने या पंडितांचा उत्तम प्रकारें सत्कार केला व वैय्याकरणकेसरी घुलेशास्त्री यांना गांव जहागीर देऊन येथेच राहण्यास विनंती केली. सदाशिवशास्त्री घुले यांनी राजाच्या पत्रास पाठविलेल्या उत्तरांत नागपूरकर भोसल्यांची दानशूरता व पराक्रम यांचें उत्तम वर्णन केलें आहे. सदाशिवशास्त्री नागपूरला राहावयास तयार झाल्यानंतर त्यांना भोसले सरकारच्या वतीने अडीच हजार रुपयांची वार्षिक नेमणूक करून देण्यांत आली व पुढे इ. स. १८२६ सालीं त्याऐवजी कळमेश्वरजवळचें वरवड हें गांव जहागीर देण्यांत आलें. फ. स. १२२६ च्या ह्या सनदेंत, " १५०० जातीस रुपये पंधरासे, १०००पालखीमध्ये अफतागिरीचे खर्चाबद्दल रुपये एक हजार एकूण रुपये अडीच हजार २५०० या ऐवजी." असा उल्लेख आढळतो. तात्पर्य, या उल्लेखावरून शारदोपासकांना आश्रय देण्याची भोसले राजांची उदार प्रवृत्ति जशी दृष्टोत्पत्तीस येते त्याचप्रमाणे दुसऱ्या रघूजीच्या अथवा अप्पासाहेबांच्या काळापूर्वीपासूनच पांडित्याची परंपरा राजे भोसले यांच्या आश्रयाने नागपूरला नांदत होती हेंहि स्पष्ट होतें. नामनिर्देशच करावयाचा तर भोसल्यांचे कारभारी देवाजीपंत चोरघडे यांच्या काळीं एक मैथिली पंडित नागपूरला स्थायी झाला होता व त्याने पुरंजन नांवाचें काव्य लिहिलें असा पुरावा मिळतो. वीर राघवाचार्य, कृष्णशास्त्री रामानुज, सीतारामशास्त्री केळवदकर, रामशास्त्री खरे इत्यादि प्राचीन व गजाननशास्त्री वखरे, घुलेशास्त्री, म. म. भट्टजीशास्त्री घाटे, गंगाधरशास्त्री मंगरूळकर, दादाजीमहाराज साधू, गोपाळशास्त्री हरदास इत्यादि त्या मानाने अर्वाचीन पंडित व कविश्रेष्ठ यांचीं घराणीं भोसले राजघराण्याच्या आश्रयानेच उदयास आलीं. यांपैकी सदाशिवभट्ट घुले यांनी व्याकरणशास्त्रावर केलेली ग्रंथरचना व्याकरणशास्त्रांतील नवसाम्प्रदायिकांना उचलून धरणारी आहे. शब्देन्दुशेखरांवर त्यांनी केलेली भट्टी या नांवाची टीका व्याकरणशास्त्राज्ञांच्या आदराचा विषय झालेली आहे. भट्टजीशास्त्री घाटे यांची उत्तररामचरित्रावरील टीका प्रसिद्धच आहे. दादाजीमहाराज साधू व गोपाळशास्त्री हरदास यांच्या प्रसादपूर्ण व पांडित्यपूर्ण रचनांचा प्रभाव अजूनहि या प्रांतांतील जुन्या पिढीच्या संस्कारित रसिकमनावर असून; गंगाधरशास्त्री मंगरूळकर यांनी तर गीतगोविंदाशीं स्पर्धा करणारी काव्यरचनेची चमक

२

दाखविलेली आहे. भोसले राजघराण्याच्या आश्रयानेच शारदोपासकांची ही दीप्तिमान् परंपरा नागपुरांत निर्माण झाली, नांदली व विकासली. पण खड्गाने कृतीचा लेख इतिहासाच्या रंगपटावर चित्रित करणाऱ्या या राजवंशांत विद्या, कला व पांडित्य यांना उदार आश्रय देणाऱ्या या रसिकतेबरोबरच स्वतः साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने शारदोपासना करणारी सर्जनशील प्रतिभाहि नांदत होती हें विशेष होय. या सर्जनशील प्रतिभेचें खरें स्वरूप हल्लीचे नागपूरचे राजेबहादूर रघोजीरावसाहेब भोसले यांचे वडील श्रीमंत राजे जानोजीमहाराज भोसले यांच्या व्यक्तित्वाच्या आश्रयानेच प्रकट झालेलें असलें तरी राजे जानोजी भोसले यांच्याहि पूर्वी या राजघराण्यांतील पुरुषांनी केलेली कांही तुरळक कविता आढळते.

## राजघराण्यांतील भजनसम्प्रदाय

या राजघराण्यांतील राजपुरुषांना उत्तम वादक व गायक पदरीं बाळगून भजन करण्याचा नाद फार पूर्वीपासून असलेला दिसून येतो. आजहि एकादशी, गुरुवार व सोमवार या दिवशीं ८६ वर्षांचे वृद्ध व विशेष हालचाल करण्यास असमर्थ असलेले राजेबहादूर रघोजी रावसाहेब भोसले हे स्वतः व्रत म्हणून भजन करीत असतात. दहा-पंधरा वर्षांपूर्वीपर्यंत राजेसाहेबांच्या भजनाला रसिकजनांची रीघ लावण्याइतकें तें प्रभावी असे. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव कुंवर फत्तेसिंगरावसाहेब भोसले यांनीहि हा भजनसंप्रदाय पुढे चालविला आहे. भोसले राजघराण्याची तुरळक कविता या भजनसम्प्रदायामुळेच सुरक्षित राहिलेली आहे. अव्यवस्थितपणामुळे या राजघराण्यांतील इतर कागदपत्रांचा व ग्रंथसंग्रहाचा फारसा पत्ता लागत नसला तरी भजनांतून म्हणण्यासाठी व रोजच्या पूजेसाठी भजनी पदांचीं जीं बाडें सुरक्षित ठेवलेलीं आहेत त्यांतून राजघराण्यांतील कविता दृष्टोत्पत्तीस येते. राजे जानोजीमहाराज यांच्या पूर्वींची जी कविता या बाडांतून उपलब्ध होते ती बरीचशी अशुद्ध आहे. या राजघराण्याची दरबारी भाषा यावनी असल्यामुळे, हिंदी व मिश्र मराठीचे अशुद्ध प्रयोग कवितांतूनहि आहेत व या कवितांना कविता म्हणण्याऐवजी पदें म्हणणेंच जास्त सोयीचें ठरेल. अशीं कांही भजनी पदें राजपुरुषांचींच असल्याचें परंपरागत माहितीवरून स्पष्ट दिसत असलें तरी तीं नक्की कोणाचीं आहेत हें सांगणें फार कठीण आहे. उदाहरणार्थ, राजघराण्याच्या भजनसंप्रदायांत परंपरेने चालत आलेलें पुढील पद पाहाः—" सज्जनगडके वासि हमारे रामदासगुरुराज धनी है ।। ध्रु० ।। हातोमे कुबडी गले विच माला रामपुजनपर ध्यान धरत है । शुभ्र कौपिन भगवी मेखला भगवा बाना झुकत झुकत है ।। १ ।। सीस आवळू जटाभार है पाव खडावा चटक चटक है । देवताके सेवेखातिर सज्जनगडपर वास करत है ।। २ ।। " हें पद आपल्या घराण्यांतील पुरुषांचेंच आहे अशी आजच्या पुरुषांची निश्चिति असली तरी तें कुणाचें आहे हें त्यांनाहि सांगतां येत नाही. कांही राजपुरुषांनी मात्र आपल्या रचनेच्या शेवटीं स्वतःचें नांव घालून ठेवलेलें असल्यामुळे, त्यांच्या कार्यासंबंधी संशय राहत नाही. अशा पुरुषांपैकी विख्यात पुरुष म्हणजे मुधोजी ऊर्फ अप्पासाहेब भोसले ( इ. स. १८१७–१८ ) हे होत.

## अप्पासाहेब भोसले यांचें करुणगीत

राजे अप्पासाहेब भोसले यांचें केवळ एकच पद हल्ली भोसले घराण्याच्या भजनी बाडांत आढळतें. तें पद कुणाचें आहे व कोणत्या प्रसंगीं लिहिलेलें आहे याची जर कल्पना

नसली तर तें एखाद्या साधुपुरुषाने जीवनाविषयीच्या विरक्तीने लिहिलें आहे असें वाटतें. पण त्याच्या मागच्या पार्श्वभूमीची यथार्थ कल्पना असली तर मात्र त्यांतील कारुण्याचा स्वर अंतःकरणांत कालवाकालव उत्पन्न केल्याविना राहत नाही.

## पदाची पार्श्वभूमि

भोसले राजवंशांत अप्पासाहेब भोसले हे जसे स्वाभिमानी तसेच मोठे दुर्दैवी पुरुष होते. नागपूरच्या गादीवर ते येतांच त्यांच्या स्वाभिमानी बाण्यामुळे, ते हळूहळू या देशाभोवती आपले पाश आवळीत असलेल्या इंग्रजी सत्तेचे जसे शत्रु बनले, असेच स्वतःच्या वेंधळेपणामुळे इंग्लिशांच्या अटकेंतहि सापडले. त्यांना बंदी करून दूरच्या प्रदेशांत नेत असतां स्वतःच्या बुद्धिचापल्याचा उपयोग करून घेऊन ते इंग्रजांच्या हातांतून निसटले व पुढे स्वतंत्रपणें केलेल्या सर्व खटपटींत अपयश येऊन दुःखद स्थितींत कित्येक वर्षांनी हा राजपुरुष राजपुतान्यांत मृत्यु पावला. त्यांच्या त्या परागंदा विपन्न अवस्थेंत पतीराम या नांवाचा त्यांचा एक निष्ठा-वंत सेवक त्यांना भेटला. आपला प्रसाद अथवा संदेश म्हणून अप्पासाहेब भोसले यांनी या पतीरामाला एक हिंदी पद दिलें व राजघराण्याच्या आजच्या भजनीबाडांत त्यांचें म्हणून तेवढें एकच पद उपलब्ध आहे. तें पद असेः—

“ जिंदगी दो दिनकी दो दिनकी । जुगजुग बीती किनकी ? ।। ध्रु० ।। जिस खातिर कहे मेरा मेरा वो क्या तेरा साथी । धनदौलत और माल खजीना आखरतनकी मिट्टी ।। १ ।। जोरू लडका नौकरचाकर जबलग दानापानी । एक घडी ऐसी आवेगी अस्मानी सुल-तानी ।। २ ।। वैद बुलाकर हात बतावे मांगे दवा और दुवा, एक घडी ऐसी आवेगी मिली हवामें हवा ।। ३ ।। आप्पा कहे ये हवाल अपना है सब सपना भाई । जिस खातर ये भजन बनाया पतीराम ललकाई ।। ४ ।। ”

राजे अप्पासाहेब भोसले यांना इंग्रज सेनापतीने दिलेली अपमानास्पद वागणूक, स्वप्ना-सारखें इंग्लिशांच्या अस्मानी-सुलतानीने गेलेलें त्यांचें राज्य व वैभव, परागंदा अवस्थेंत वांट्यास आलेलीं दुःखें व सभोवार पसरलेल्या निराशेच्या अंधकारांत विजनवासीपणाने घालवावें लागणारें असहाय जीवन यांच्या पार्श्वभूमीवर ही कविता वाचली म्हणजे ती अन्तःकरणाला चटका लावल्याविना राहत नाही.

अशा कांही अत्यंत तुरळक कविता आढळतात; पण शारदोपासनेच्या क्षेत्रांत सर्जन-शील प्रतिभेचा खरा प्रत्यय आणून देणारे राजपुरुष म्हणजे राजे जानोजी भोसले हे होत. त्यांच्या वेळीं नागपूरच्या भोसल्याचें राज्य खालसा झालेलें होतें व त्यांना राजा ही केवळ नाममात्र उपाधि नव्या साम्राज्यकर्त्यांनी दिलेली होती. पण राज्य व अधिकार संपलेले असले तरी सर्व प्रकारचें राजवैभव मात्र उर्वरित होतें. या वैभवाचा त्यांनी जितका सदुपयोग केला इतका दुसऱ्या कोणी राजपुरुषाने अलीकडच्या काळांत क्वचितच केला असेल. राजे जानोजी हे रसिक, उदार, कलावंतांचे व विद्वानांचे पोशिंदे, संस्कृत, फारशी, हिंदी व मराठी या भाषांचे उत्तम ज्ञाते असून हिंदी, मराठी व संस्कृत या भाषेंतून त्यांनी प्रसादपूर्ण कविता निर्माण केलेली आहे. ते जसे कवि तसेच कोशकारहि होते. या कर्तृत्वसंपन्न राजपुरुषाच्या चरित्राचा व शारदोपासनेचा विस्तृत परिचय पुढील लेखांकांत करून देऊन या विषयाचा निरोप घेऊं. ● ● ●

सुरेश म. डोळके

# 'नरींद्रा'चा प्रतिभा-विलास*

महानुभावीय कवि 'नरींद्र' हा कलाकाव्य (*Literary epic*) निर्माण करणारा मराठींतला आद्य व अग्रगण्य महाकवि आहे. 'वेद, स्मृति, पुराणें' [१६] यांच्या-प्रमाणेच 'आणीकें काव्यें नाटकें कथा : आख्यानें प्रबंध चित्र गाथा' [१७] इत्यादिकांच्या परिशीलनाने प्रगल्भ झालेल्या प्रतिभेने नरींद्राने 'रुक्मिणी-स्वयंवरा'चें भव्य शिल्प उभारलें. पुराणिकाच्या व्यासपीठावरून नव्हे, तर महाकवीच्या सिंहासनावरून त्याने श्रीकृष्ण-कथेचें गायन केलें आहे. तें करीत असतांना कथानकाचा धागा त्याने 'भागवत' व 'पद्मपुराण' यांतून घेतलेला असला [७५], व हर्षाचें 'नैषधीयचरित' त्याच्या डोळ्यांपुढे असलें तरी मूळ कथेच्या रूपरेषेंत त्याने भरलेले प्रतिभेचे रंग मोठे विलोभनीय आहेत यांत शंका नाही.

**रुक्मिणीचे विरहोपचार**

'नैषधां'त दमयंतीच्या विरहोपचारांसंबंधी—

'उपचचार चिरं मृदुशीतलैर्जलजनालमृणालजलादिभिः ।
प्रियसखीनिवहः स तथा क्रमादियमवाप यथा लघु चेतनम् ॥' [४-११२]

एवढेंच म्हटलें आहे. नरींद्राने मात्र

'दांडीये वरूनि उतरतां : पाइ पाउवा न लेता
वीकळ आंग न धरता : भवंडी आली' [३८९]

अशी विरह-व्यथित रुक्मिणीची अवस्था झाल्यानंतर तिच्या सख्यांनी केलेल्या शीतलोप-चारांचा चौपन्न ओव्यांत [४०६-४१४; ५३८-५७४; ५९५-६०५] मनोज्ञ विस्तार केला आहे. 'नैषधां'त दमयंती विरह-व्यथेने मूर्छित पडल्यानंतर त्या कन्यान्तःपुरांत तिचा पिता व त्याच्यामागोमाग एक मंत्री व वैद्य प्रवेश करतात, असें हर्षाने दाखविलें आहे. [४-११६]. नरींद्राजवळ अशी अरसिकता नव्हती. त्याने कुणाहि पुरुषाला रुक्मिणीच्या अन्तःपुरांत प्रवेश दिला नाही. भावकळना, मालती, गंधावती इत्यादि सख्यांनी रुक्मिणीला शुद्धीवर आणण्याकरिता नानापरींचे विरहोपचार केले [५३७-५७२] आणि रुक्मिणी किंचित् सावध झाल्यानंतर भावकळनेने तर हळूच

'देवें-वीण देह न धरे नीरूतें : आणीक उपावो नाही वो मातें
ऐसाहीं काहीं देखसी मंत्रातें : तरि करूं लाग' [६४६]

---

* प्रा. सुरेश डोळके यांनी 'नरींद्रा'च्या संपूर्ण 'रुक्मिणीस्वयंवरा'चें संपादन केलें आहे. प्रस्तुत लेख हा त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतील एक भाग होय.

असें रुक्मिणीचें हृद्गतहि तिच्याकडूनच काढून घेतलें. २५० ओव्यांच्या प्रस्तुत प्रसंगाच्या निर्मितींत नरींद्राच्या प्रतिभेचें धारणा-सामर्थ्यच केवळ नव्हे, तर स्त्रीच्या हृदयवीणेच्या सूक्ष्म झंकारांशीं समरस होणारी त्याची हळुवार भावनाशीलताहि व्यक्त होते.

याच संदर्भात त्याने केलेले धारा-दामोदराचेंहि वर्णन लक्षांत घ्यायला हवें. रुक्मिणीचा विरहानल कमी व्हावा म्हणून नरींद्राने हिमवंतीच्या गोठलेल्या बर्फाचे चिरे काढून त्यांचा नक्षीदार 'धारा-दामोदर' घडविला आहे; हिमालयाशीं स्पर्धा करणारें सोळा खणांचें चंदनी अंतर्गृह त्यांत उभारलें आहे. त्यांतल्या सज्ज्यांत शिल्पशास्त्राची सगळी शोभा अवतरली होती. त्याचें छत कंदर्प-केतकीच्या लतिकांनी शृंगारलें होतें. कापूर–कस्तुरींनी रेखाटलेलीं तेथलीं चित्रें ! तीं पाहण्याकरिता प्रत्यक्ष अनंग रतीचें 'दादुलेपण' सोडून तेथे आला होता. धारा-दामोदराच्या शिखरावर विराजमान झालेल्या सुवर्ण–केतकीच्या हंसांच्या माथ्यांवर तळपणारें मोती इतके तेजस्वी होते की, चंद्रानेहि त्यांच्यापासून प्रकाश उसना घ्यावा ! पर्जन्य-राज वरुणाच्या 'वोतीव' विमानाप्रमाणे भासणारा तो धारा–दामोदर पाहून विजेला देखील हुडहुडी भरत होती. पण—

पण रुक्मिणीची विरह-व्यथा इतकी तीव्र होती की, तिच्या अवयवांच्या नंदनवनांत पेटलेल्या अग्नीची धग लागण्याचा अवकाश !—हिमवंतीचा एवढा धारा–दामोदर, पण तो देखील वितळून गेला !

नरींद्राच्या प्रतिभा-विलासाने पक्ष्यादिकांनी सुचविलेलें कृष्ण-रुक्मिणींचें भावी मीलन [६१०–६२४], श्रीकृष्णाच्या स्वागताकरिता देवांनी घेतलेले वृक्षावतार [८३५–८४१], श्रीकृष्णाच्या स्वागतार्थ वनदेवतांची तयारी [७७४–७७९], वनस्पति व वनदेवता यांचा संवाद [८२१–८३४], अलंकारांच्या फुलांनी नटविलेली श्रीकृष्णमूर्ति [१०८९–१११०] इत्यादि वर्णनांचीं रम्य उद्यानें प्रस्तुत महाकाव्यांत जागोजागीं फुलविलीं आहेत.

श्रीकृष्णाला 'ओळगण्या'करिता अष्ट लोकपाळांनी आठ वनें द्वारकेला पाठविलीं होतीं ही कल्पनाच किति भव्य आहे !

**रुक्मिणी–'पत्रिका'**

रुक्मिणीने श्रीकृष्णाला पाठविलेल्या 'पत्रिके'चा मात्र स्वतंत्र उल्लेख केला पाहिजे. रुक्मिणाने श्रीकृष्णाला लिखित पाठविलें असें 'भागवत', 'हरिवंश', 'पद्मपुराण' व 'विष्णुपुराण' या रुक्मिणीस्वयंवराची कथा नमूद करणाऱ्या पुराण–ग्रंथांत कुठेहि म्हटलेलें नाही. महाभारताचें खिलपर्व जें 'हरिवंश', त्यांत—

'रुक्मिणी त्वभवद्राजन्रूपेणासदृशी भुवि
चक्रमे वासुदेवस्तां श्रवादेव महाद्युतिः ॥' [ह. वं. ५९–१६]

असें म्हटलें आहे. त्यावरून, रुक्मिणीच्या सौंदर्याची ख्याति ऐकूनच 'महाद्युति वासुदेवाचें मन तिजविषयी मोहित झालें होतें एवढेंच दिसतें. त्यांत पत्रिकेचा, किंबहुना रुक्मिणीने श्रीकृष्णाकडे पाठविलेल्या ब्राह्मणाचाहि, उल्लेख नाही.

'पद्मपुराणां'त 'पुरोहितसुतं विप्रं प्रेषयामास रुक्मिणी' [प. पु. उत्तरखंड, २७४–२२] असा रुक्मिणीने श्रीकृष्णाकडे 'विप्रा'ला पाठविल्याचा उल्लेख आहे. पण त्याच्याबरोबर तिने 'पत्रिका' दिल्याचा मात्र मुळीच निर्देश नाही. उलट, त्या ब्राह्मणाने 'एकान्ते सर्वमाचष्ट रुक्मिणीभाषितं तयोः' [प. पु. उ. खं. २७४-२३] म्हणजे रुक्मिणीचें भाषित राम व कृष्ण या दोघांनाहि सांगितलें असें म्हटलें आहे.

'विष्णुपुराणां'तहि रुक्मिणी-स्वयंवराची कथा येते [अंश ५, अ. ३६]. त्यांतहि 'मनोहर हास्य करणारी रुक्मिणी व कृष्ण यांना परस्परांविषयी अभिलाष उत्पन्न झाला व कृष्णाने रुक्मिणीला मागणीहि घातली' एवढेंच या बाबतींत सांगितलें आहे.

'भागवतां'त 'विचिंत्याप्तं द्विजं कञ्चित् कृष्णाय प्राहिणोद् द्रुतम्' [द० स्कं० ५२-२६]

असें म्हटलें आहे. त्यावरून, 'रुक्मिणीने फार विचार करून एका विश्वासपात्र ब्राह्मणाला श्रीकृष्णाकडे त्वरित पाठविलें' एवढेंच निष्पन्न होतें. ब्राह्मणाने श्रीकृष्णाला रुक्मिणीचा संदेश सांगितला, रुक्मिणीचें लिखित दिलें असें नव्हे.

लीलागृहीतदेहेन तस्मै सर्वमवर्णयत्' असें 'भागवतां'त स्पष्ट म्हटलें आहे. 'रुक्मिण्युवाच' असें म्हणून ब्राह्मणाने श्रीकृष्णाला रुक्मिणीचा निरोप सांगितला व तो सांगितल्यानंतर ब्राह्मण म्हणतो—

'इत्येते गुह्यसंदेशा यदुदेव मयाऽऽहृताः ।
विमृश्य कर्तुं यच्चात्र क्रियतां तदनंतरम् ॥' [द. स्कं. ५२-४४]

पुराणग्रंथांतल्या या सर्व उल्लेखांत रुक्मिणीने श्रीकृष्णाकडे लिखित पाठविलें होतें असें कुठेच म्हटलें नाही.

'श्रीमद्भागवता'च्या ८३ व्या अध्यायांत द्रौपदीच्या विचारणेवरून श्रीकृष्ण-पत्नींनी आपापल्या विवाहकथा द्रौपदीला सांगितल्या आहेत. त्यांत सुरुवातीलाच रुक्मिणी सांगते—

'चैद्यायमर्पयितुमुद्यतकार्मुकेषु
राजस्वजेयभटशेखरिताङ्घ्रिरेणुः ।
निन्ये मृगेन्द्र इव भागमजाविगूथात्
तच्छ्रीनिकेतचरणोऽस्तु ममार्चनाय ॥' [द. स्कं., ८३-८]

या एकाच श्लोकाचा विस्तार मोरोपंतांनी 'कृष्णविजयां'त सुमारें ९० आर्यांत केला आहे. पण या श्लोकांतसुद्धा 'पत्रिके'चा ओझरताहि उल्लेख नाही.

मग नरींद्राने ही 'पत्रिके'ची कल्पना कुठून घेतली? आपण आपली कथा 'भागवत' व 'पद्मपुराण' यांतून घेतली असें तो वारंवार सांगतो. पण त्या मूळ ग्रंथांत तर पत्रिकेचा पत्ता नाही.

**मराठी कवि व रुक्मिणी-पत्रिका**

रुक्मिणी-स्वयंवराचें गायन मराठींत पहिल्यांदा महदंबेने केलें आहे [शके १२०८]. महदंबेची रुक्मिणीहि—

'जाइं वेगीं वीप्रा कृष्णरायाजवळा :
माझी वीनती सांधावी गोपाळां' [ध. पू. १२]

असें 'वीप्रा'ला म्हणते व त्याला अनुसरून तो विप्रहि

भीमका कुमरी सुंदर रुक्मीणी लावण्यरासी:
त्रैलोक्यमोहिनी तीया वीनती पाठवीली [तुम्हांसी] [ध. पू. २१]

असें 'यादवांच्या राण्या'ला सांगतो. अर्थात्, यांतहि लिखिताचा उल्लेख आहे असें म्हणतां येत नाही

यावरून, 'नरींद्रा'च्या पूर्वी लिहिण्यांत आलेल्या 'रुक्मिणीस्वयंवरा'च्या एकाहि कथेंत लिखिताचा उल्लेख नाही असें म्हणावें लागतें.

नरींद्रानंतर रुक्मिणीस्वयंवरावर काव्यरचना करणाऱ्या एकनाथ, सामराज, विठ्ठल इत्यादि कवींनी मात्र आपल्या काव्यांत, 'श्रीमद्भागवता'चा आपण आधार घेतला असें म्हणत म्हणत, 'रुक्मिणी-पत्रिके'चा उल्लेख केला आहे.

रुक्मिणीस्वयंवर लिहितांना 'मूळ सांडून सर्वथा । नाही वाढविलें ग्रंथा' असें म्हणणाऱ्या एकनाथांनीहि 'कृष्णप्राप्तीचा सद्भावो । यालागी तो सुदेवो । कृष्णप्राप्तीशी धाडिला पहा हो । निजपत्रिका देवोनी' [ रु. स्व. १-४६ ] असा पत्रिकेचा निर्देश केला आहे. 'जे बोलली भागवतीं पुराणीं । विस्तारीली जे पुरुषी पुराणीं' [ सामराज, रु. ह. १-३१ ] असें म्हणणारा सामराजहि 'मुद्रामुद्रित पत्रिका करुनि ते विप्रापुढे ठेविली' [ रु. ह. ४-८ ] असा 'मुद्रामुद्रित पात्रिके'चा उल्लेख करतो. पण त्याबरोबरच 'कृष्णास ते हळूच तोंडनिरोप सांगे' [ रु. ह. ४-९ ] असेंहि त्याने म्हटलें आहे. विठ्ठलानेहि 'वदे भीमकी वासुदेवा सुदेवा । त्वरें जाउनी पत्र दे वासुदेवा' [ विठ्ठल, रु. स्व. १-२४ ] असा पत्राचा उल्लेख केला आहे.

नरींद्राची रुक्मिणी-पत्रिका

नरींद्राने रुक्मिणी-पत्रिकेचें वर्णन तर फारच बहारीने केलें आहे. तो म्हणतो—

'मग भूजपत्र घेतलें रुक्मिणी : हातीं कमळदलाची लेखणी
विनती लेहतासे पुरी कवणी : अक्षेरी परागाचां' [ ६७७ ]

आणि पुढे त्याने दहा ओव्यांत या परागांच्या अक्षरांची सुरम्य मालिका गुंफली आहे. श्रीकृष्णाला 'मुद्रीत वाचीजे जाण राया' असें नरींद्राचा सुदेव म्हणतो [ १२०५ ] आणि श्रीकृष्णानेहि

'ते मुद्रीत वाचीली श्रीहरी : ज्ञानदृष्टी' [ १२०६ ] असें नरींद्र म्हणतो.

नरींद्राने वर्णिलेली रुक्मिणीची प्रणय-पत्रिका प्रीति आणि अधीरता या भावांनी रसरसलेली आहे.

केवल तोंडी निरोपापेक्षा 'लिखितां'त भावनेचा आविष्कार अधिक सुंदर होतो. रुक्मिणीच्या अंतःकरणांतील श्रीकृष्णाविषयीची हळुवार भावना !—दुसऱ्याबरोबर पाठविलेल्या तोंडी निरोपांतून त्या भावनेची हळुवार उत्कटता कशी व्यक्त होईल ?—हें जाणूनच नरींद्रासारख्या भावसंकुल व कलाचतुर कवीने रुक्मिणीचें भावलिखित निर्माण केलें असावें. भूजपत्रावर कमळदळाच्या लेखणीने परागाच्या अक्षरांत काढलेला रुक्मिणीच्या हृदयांतल्या नाजूक भावनांचा आलेख !

किन्नराचें उपाख्यान

नरींद्राच्या प्रतिभेचा उन्मेष व तिचें धारणासामर्थ्य या दोन्ही दृष्टींनी 'रुक्मिणीस्वयंवरां'-तील किन्नराच्या विस्तृत उपाख्यानाचाहि निर्देश केला पाहिजे. रुक्मिणीची विवाहचिंता भीमकाला अस्वस्थ करीत होती. त्याच्या राजसभेंत रुक्मिणी बसली असतांना कल्याणकीर्ति नांवाचा एक भाट तेथे येतो. त्याच्याबरोबर, मधुवनांत वेदध्यान करीत असलेला एक किन्नर असतो. हा किन्नर म्हणजे रंभेशीं संभोगसुख नाकारल्यामुळे शापभ्रष्ट झालेला पूर्वाश्रमीचा वेदघोष ऋषि [१५५]. एकदा नरींद्राने याचा निर्देश 'नंदघोष ऋषि' असाहि केला आहे [३६७]. अंबिकेच्या देवालयांत रुक्मिणी श्रीकृष्णाला वरमाला घालील तेव्हा तुझें किन्नर-कवच फिटेल असा रंभेने किन्नराला उश्शाप दिला होता [ १५६ ]. त्याप्रमाणे 'अंबिकापुरां'त रुक्मिणीने श्रीकृष्णाला माळ घालतांच किन्नराचा शाप संपला व त्याला पुन्हा दिव्य शरीर प्राप्त झालें [ २५४२, २५४३ ].

कुशल प्रश्न झाल्यावर ' आपण कोणकोणते देश पाहिले ? कोणकोणत्या देशांचे व दिशांचे कोणकोणते राजकुमार आपण पाहिले ? ' अशी भीमकाने कल्याणकीर्तीला पृच्छा केली [ १५०–१५१ ]. कल्याणकीर्तीने, कन्येच्या विवाहचिंतेने अस्वस्थ झालेल्या ' नृपाचें मन जाणीतलें ' व किन्नराला देशोदेशींच्या राजांची प्रशस्ति गायला लावली. किन्नराने स्वर्ग, नागलोक, सप्तद्वीप, जंबुद्वीप व पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण, ईशान्य, नैर्ऋत्य इत्यादि सर्व दिशांच्या देशांची व तेथील राजांचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं. पण—

' कन्हणीं सांधतां भूपाळु : देवीचेया मना न ये आळमाळु
तेव्हळि कीन्नरुराजें देखीला ढाळु : डोळेयाचा ' [ २८८ ]

शेवटीं किन्नराने श्रीकृष्णाचें गायन केलें. तें ऐकतांच रुक्मिणीला श्रीकृष्णाचा वेधच लागला व तिचा ' भाव ' जाणून भीमकानेहि रुक्मिणी श्रीकृष्णाला देण्याचा विचार निश्चित केला. किन्नरानेहि ' मुरारी वसे देवीचां मनीं ' असें पाहून ' पावसी चींतीलेया मनोरथु ' असा रुक्मिणीला आशीर्वाद दिला.

**किन्नराचें उपाख्यान व मराठी रुक्मिणीस्वयंवरें**

किन्नराचें हें उपाख्यान आपण ' भागवत ' व ' पद्मपुराण ' यांतून घेतल्याचें नरेंद्र सांगतो [ ७५,२५४३ ]. पण ' भागवतां 'त व ' पद्मपुराणां 'त किंबहुना ' हरिवंश ' व ' विष्णुपुराण ' यांतहि, या वृत्तान्ताला कोठीचाहि आधार नाही. एकनाथ [ रु. स्व.१–१८, १९ ], सामराज [ रु. ह. २–५९ ], विठ्ठल [ रु. स्व. १–११ ], श्रीधर [ हरिविजय, २३–३१ ] इत्यादि श्रीकृष्ण-कथेचें आपापल्या परीने संकीर्तन करणाऱ्या मराठी कवींच्या 'रुक्मिणी-स्वयंवरां 'तहि किन्नराचा उल्लेख नाही.

महदंबेच्या ' धवळ्यां 'त

' द्वारकेहूनि कौडण्या आले नागारी :
तिहीं सर्वेश्वरु वाखाणिले नानापरीः ' [ ध. पू. ३ ]

असा नागारींचा म्हणजे भाटांचा उल्लेख आहे; पण किन्नराचा नाही. संतोषमुनि कृष्णदास, गोपाळदास, कृष्णमुनि विराटदेशे इत्यादि महानुभाव कवींच्या ' रुक्मिणी-स्वयंवरां 'त मात्र कल्याणकीर्ति भाट व शापभ्रष्ट वेदघोष म्हणजेच किन्नर या दोघांचाहि उल्लेख असल्याचें डॉ. कोलते यांनी नमूद केलें आहे [ रु. स्व. प्रस्ता. पृ. २३ ]. कृष्णमुनि विराटदेशे हा तर

' मधुवन मज तेथे किन्नरू भेटला हा ' ( प्र. २–२ )

असें आपल्या नवखंड ' रुक्मिणीस्वयंवरां 'त स्पष्ट म्हणतो.

**महानुभावीय पुराण-ग्रंथांचा आधार ?**

'रुक्मिणीस्वयंवरा'वर काव्यरचना करणाऱ्या इतर कवींच्या काव्यांत किन्नराचें उपाख्यान येऊं नये पण महानुभाव कवींच्या काव्यांत मात्र तें यावें व त्यांनी आपण ' भागवत ' व ' पद्मपुराण ' यांतून तें घेतल्याचें नमूद करावें [ संतोषमुनि कृष्णदास, रु. स्व. २७–२२९–२–१३० ] यावरून महानुभावांचें एखादें वेगळें ' भागवत ' किंवा ' पद्मपुराण ' असावें की काय अशी शंका येते.पण महानुभाव पंथाचा स्वीकार करण्यापूर्वीच नरेंद्राने प्रस्तुत रुक्मिणी-स्वयंवर लिहिलें असल्यामुळे किन्नराच्या उपाख्यानाला त्याने महानुभावीय पुराण-ग्रंथांचा आधार घेतला असावा की काय, या शंकेला जागा राहत नाही. शिवाय, ' नरेंद्रा ' पूर्वी लिहिण्यांत आलेलें एकहि महानुभावीय ' भागवत ' किंवा ' पद्मपुराण ' उपलब्ध नाही हें वेगळेंच. किन्नराचें विस्तृत उपाख्यान ही नरेंद्राच्या उन्मेषशाली प्रतिभेची स्वतंत्र निर्मिति

आहे. सर्व महानुभाव कवींनी ' नरींद्रा 'चें अनुकरण करूनच कल्याणकीर्ति भाट व शापभ्रष्ट वेदघोष म्हणजेच किन्नर यांचा कथाभाग आपल्या 'रुक्मिणीस्वयंवरां' त योजला हें स्पष्ट दिसतें.

**किन्नराची कल्पना**

नरींद्राने हा किन्नर कोठून घेतला असावा ? अनेक ग्रंथांच्या परिशीलनाने नरींद्राची प्रतिभा संस्कारित झाली होती. ' किन्नर-कवचा 'चें वर्णन करतांना [ १५५ ], श्वेतकेतु ऋषींना पाहतांच कमलवनांत राहणाऱ्या लक्ष्मीला कामविकार उद्भवला होता, हें बाणभट्टाच्या ' कादंबरी 'तलें वर्णन* नरींद्राच्या डोळ्यांपुढे नसेलच असें म्हणवत नाही. नरींद्राचा किन्नर ' शब्दवेधी ' असून संगीतशास्त्रांत प्रवीण आहे. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ या तिन्ही लोकांतील संगीताची व संगीतशास्त्राची त्याला प्रत्यक्ष माहिती आहे. त्याच्या गायनाने कमळ–स्वतुर या पाताळींच्या गायकांचेंच केवळ नव्हे, तर गंधर्व व प्रत्यक्ष शारदा यांचेंदेखील गायन-कलेंतलें नैपुण्य संपुष्टांत येतें. स्वर्ग, नागलोक, सप्तद्वीप, जंबुद्वीप व उत्तर, दक्षिण, नैर्ऋत्य इत्यादि दिशांकडील अनेक देश तो फिरून आला आहे.

हा वृत्तान्त वाचून संस्कृत पुराण-ग्रंथांतील नारदाची व्यक्तिरेखा डोळ्यांपुढे उभी राहते. कालिदासाने ' कुमारसंभवां ' त नारदाचा असाच मार्मिक उपयोग करून घेतला आहे. उपवर पार्वती पित्याजवळ बसलीं असतांना ' कामचर ' नारद तेथे येतात व पार्वतीकडे पाहून

' समादिदेशैकवधूं भवित्रीं प्रेम्णा शरीरार्धहरां हरस्य ' [ कुमार. १-५० ]

असें हिमालयाला सांगतात. नरींद्राचा किन्नरहि, भीमकाच्या ' उसंगीये ' बसलेल्या रुक्मिणी-कडे पाहून

' रुक्मीणीचिया लावण्या उदारा : जरी सौंदरू जोडे नोवरा
तरि येयाचि एकि इस्वरा : केलें आराधने ' [ ३४२ ]

असें भीमकाला सांगतो.

' कुमारसंभवां 'तल्या नारदाप्रमाणेच ' नैषधां 'तल्या राजहंसाशींहि किन्नराचें साम्य आहे. महाभारतांतल्या राजहंसाचें ' नैषधां ' त चतुर व सुसंस्कृत मानवांत रूपांतर झालें आहे. नलासारख्या थोर सम्राटाचीहि कानउघाडणी करणारा, त्याच्या उपकाराची परतफेड करणारा, दमयंतीला चाळवून दूर नेणारा, तिचा स्त्रीस्वभाव जागून सावध राहणारा व हलुवारपणें नलस्तुतीचा उपन्यास करून नलाबरोबरच स्वतःहि दमयंतीच्या हृदयांत स्थान मिळविणारा, सुवर्णाचे पंख असलेला हंस हा पक्षी नसून ' हंस ' या नांवाचा कुणीतरी अलौकिक मानव आहे असा भास होतो. नरींद्राने किन्नरालाहि अनेकदा ' पाखिरू ' म्हटलें आहे. [ १६०, ६३८, ६६१, ८०४ ]. त्याला ' पक्षी '. [ १६१, ३६० ] व ' विहंगम ' [ १६८ ] असेंहि तो म्हणतो. इतकेंच नव्हे तर

' मग आवघी देखतां सभा : पाख फडकरूनि ठेला उभा ' [ १६९ ]

असें त्याचें वर्णनहि नरींद्राने केलें आहे. असो;

प्रस्तुत उपाख्यानाच्या उभारणींत नरींद्राच्या प्रतिभेचा उन्मेष व भव्य कलाकृति निर्माण करण्याची त्याच्या प्रतिभेची धारणा-शक्ति व्यक्त होते यांत शंका नाही. ● ● ●

---

* अवतरन्तं च तदा कमलवनेषु....देवी लक्ष्मीर्ददर्श । तस्यास्तु तमवलोकयन्त्या.... मन्मथविकृतं मनः आसीत् । ['कादंबरी', पूर्वार्ध]. ( संपा. Peter Peterson, पृ. १४४ ).

शं. गो. तुळपुळे

# पंढरपूर-विठ्ठलमंदिराच्या इतिहासांतील एक अज्ञात दुवा

## प्रास्ताविक

पंढरपूर येथील विठ्ठलमंदिर व त्यांतील विठ्ठलाची मूर्ति हे संशोधकांत चर्चेचे विषय आहेत. पैकी विठ्ठलमूर्तीविषयी श्री. ग. ह. खरे[1] यांनी केलेलें विवेचन, निदान त्यांतील बराच भाग, विरुद्ध पुराव्याच्या अभावीं मान्य होण्यास हरकत नसावी. विठ्ठलमंदिराविषयी त्यांनी विशेष चर्चा केलेली नाही. 'विठ्ठलाचें हल्लींचें देऊळ फार जुनें नाही. मूळ देवळाच्या रचनेविषयी ठाम कल्पना करण्यास साधनें नाहीत, पण महाद्वारांत उभें राहिलें असतां विठ्ठलाचें सहज दर्शन होण्याइतकें लहान तें देऊळ होतें असें वाटत नाही,' या शब्दांत त्यांनी प्रस्तुत विषयाचा समारोप केलेला आढळतो.[2] सोलापूर गॅझेटियरमध्येहि देवळाच्या इतिहासाविषयी फारसें लिहिलेलें नाही. अलीकडे पंढरपूर येथील प्राचीन शिलालेख मिळवीत असतां तेथील विठ्ठलमंदिराच्या इतिहासावर नवीन प्रकाश पाडूं शकेल असें एक साधन हातीं आल्यामुळे हा विषय येथे चर्चेसाठी घेतला आहे.

## पंढरपुरांतील उपलब्ध शिलालेख

पंढरपूर येथे आतापर्यंत एकूण चार शिलालेख उपलब्ध झाले आहेत. ते ऐतिहासिक क्रमाने पुढीलप्रमाणे होत:—

१. शके ११५९ तील सोळखांबीच्या पुढील दक्षिणोत्तर सोप्यांतील तुळईवरील संस्कृत-कन्नड अशा संमिश्र भाषेंतील लेख. या लेखांत पंढरपुरास 'पंडरगे' व विठोबास 'विठल' आणि 'विठ्ठल' या नांवांनी संबोधिलें आहे (Bombay Dist. Gaztt. पृ. ४१९-४२०; खरे : श्रीविपं. पृ. ३६-३९). या लेखांत 'पंडरगे' येथील 'श्रीविठ्ठलदेवा' चे अंगभोग व रंगभोग यांसाठी हिरियगरंज हें गांव दान केल्याचा निर्देश आहे. प्रत्यक्ष देवळासंबंधी या लेखांत कांहींहि म्हटलेलें नाही.

२. शके ११९२ मधील संस्कृत शिलालेख. हा 'आप्तोर्याम इष्टी' चा लेख म्हणून प्रसिद्ध आहे. कारण त्यांत कोणी केशवपुत्र भानु याने 'पांडुरंगपुरां'त आप्तोर्याम यज्ञ केल्याचें म्हटलें आहे.[3] हा शिलालेख महाद्वारासमोरील रस्त्याच्या कोपऱ्यावर एक पोलिस-चौकी आहे त्या वास्तूंत उपलब्ध झाला. चौकीची ही इमारत देऊळवजा व जुन्या बांधणीची

१. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, २ री आवृत्ति, पृ. ४५-४९; ५०-६०.

२. सदर्हू, पृ. ७७.

३. रा. गो. भांडारकर : Vaisnavism, Saivism, & etc. (इ. स. १९१३), पृ. ८८.

असून तेथे हा लेख मिळाल्यामुळे श्री. कझेन्स[1] यांनी त्यावरून असा तर्क केला की, विठ्ठलाचें देऊळ पूर्वी या ठिकाणीं असावें. हा तर्क खोडून काढतांना श्री. खरे[2] यांनी असें सांगितलें आहे की, प्रस्तुत लेख चौकीच्या मूळच्या वाटोळ्या खांबावर नसून तिच्या भिंतींत घातलेल्या आडव्या चौकोनी खांबावर आहे. अर्थात् हा खांब मूळ वास्तूचा नसून आणखी कोठला तरी असणार हें उघड आहे. म्हणजे देवळाचा इतिहास जाणून घेण्याच्या दृष्टीने हाहि लेख निरुपयोगीच आहे.

३. शके ११९५ ते ११९९ मधील 'चौऱ्यायशीचा लेख.' यांत 'श्रीविठ्ठल देवरायासि तिसासिति फुलें दांडे आचंद्रार्क चालवेआ नाना भक्तिमालिआं दत्त पैकाचा विवरु' असें प्रारंभीं म्हटलें असून पुढे पैका देणाऱ्या भक्तांची यादी आहे. या शिलालेखा-संबंधी कै. राजवाडे यांचा तर्क असा की, "पंढरपूरच्या विठ्ठलमंदिराच्या जीर्णोद्धारास प्रारंभ शके ११९५ च्या पूर्वी दहापांच वर्षें झाला व शके ११९५ मध्ये मंदिराचें काम पूर्ण झालें. तेव्हा मंदिराच्या देवडीवर प्रस्तुत शिळा बसविली जाऊन तिजवर 'नाना भक्त (क्ति) मालिआ दत्त पैकाचा विवरु' खोदण्यास प्रारंभ झाला."[3] अर्थात् हें केवळ अनुमान आहे. कारण प्रत्यक्ष लेखांत कोठेहि मंदिराचा किंवा जीर्णोद्धाराचा उल्लेख नाही. आम्ही या लेखाचें संपूर्णतः पुनर्वाचन करून तो त्याच्या टशासह प्रसिद्धहि केला आहे.[4] त्यावरून असें वाटतें की, हा लेख देवळाच्या जीर्णोद्धाराविषयी नसून देवस्थानाच्या वाढीविषयी असावा. अर्थात् लेखांत तसें स्पष्टपणें म्हटलेलें नाही हें कबूल केलेंच पाहिजे. मात्र ही 'चौऱ्यायशीची शिळा' सध्याच्या विठ्ठलमंदिराशीं संबद्ध आहे यांत संशय नाही.

४. शके १२३३ मधील 'चोखा मेळ्या'चा म्हणून ओळखला जाणारा मराठी शिलालेख. वास्तविक या लेखाचा चोखामेळा या संतकवीशीं कोणताहि संबंध नाही. तो चोखा मेळ्याच्या समाधीपाशी पडून असल्याने त्यास हें नांव मिळालें, इतकेंच. या लेखांत पंढरपुरास 'पंडरिपुर' म्हटलें आहे. विठ्ठलमंदिराचा उल्लेख त्यांत नाही. अर्थात् प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने या लेखास महत्त्व नाही. (राजवाडे : ग्रंथमाला, वर्ष १२, अं. ३).

याप्रमाणे पंढरपुरांतील चार प्राचीन शिलालिखितें आहेत. पैकी तिसरा म्हणजे शके ११९५ मधील 'चौऱ्यायशीचा लेख' हाच काय तो विठ्ठलमंदिराच्या दृष्टीने थोडा उपयुक्त वाटतो. तो देवळाच्या जीर्णोद्धाराविषयी किंवा वाढीविषयी कसाहि समजला तरी स्थापनेविषयी नाही, हें निश्चित. शके ११९५ मध्ये विठ्ठलमंदिराची वाढ झाली किंवा त्याचा जीर्णोद्धार झाला किंवा या देवस्थानास भक्तांकडून दानें मिळवून स्थैर्य आणण्यांत आलें, एवढेंच तो सांगतो. याचा अर्थ असा की, विठ्ठलाचें देऊळ कोणत्याहि स्वरूपांत का होईना, पण शके ११९५ च्या पूर्वी अस्तित्वांत होतें. आता प्रश्न असा की, पूर्वी म्हणजे किती वर्षें अस्तित्वांत होतें? निराळ्या शब्दांत विचारावयाचें म्हणजे या इतिहासप्रसिद्ध देवळाचा प्राचीन इतिहास काय असावा?

१. Archaeological Survey of India, W. C. Report, 1897–98; p. 5.
२. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर (२ री आवृत्ति), पृ. ७५–७६.
३. वि. का. राजवाडे : ग्रंथमाला, वर्ष १२, अं. १.
४. पुणें विद्यापीठ पत्रिका, ज्ञानखंड, वर्ष १, पृ. १ ते २५.

कांहीं अनुमानें

सध्याचें पंढरपूरचें विठ्ठलमंदिर फार जुनें नाही यासंबंधीं संशोधकांत सर्वसाधारणपणें मतैक्य दिसतें. श्री. खरे म्हणतात,[1] 'महाद्वार सोडल्यास सध्याच्या देवळाचा कोणताहि भाग सोळाव्या शतकापूर्वीचा असेल असें वाटत नाही. महाद्वार व सध्याचें देऊळ यांत सर्वशः विसंवाद आहे.' 'गॅझेटियर'कारांच्या मतें तें १७ व्या शतकाच्या प्रारंभींचें असावें.[2] 'गॅझेटियर'कार लिहितात—

"The earliest architectural work in the temple is the Nāmdev gate which appears from its style, sculptures and pillars to be contemporary with the above inscription (i. e. of Shak 1159) or perhaps a little earlier. It resembles in its style the Hemadpanti remains of the Devgiri Yādav period. Under the Devgiri Yādavs a large and splendid temple may have been built here *instead of some old temple* or repairs may have been made to an old temple going to decay."

पंढरपूरचें विठ्ठलमंदिर आणि अस्पृष्ट याविषयी लिहितांना कांहीं अस्पृश्य संतांच्या वचनांच्या आधारें प्रा. श्री. म. माटे[3] यांनी असें अनुमान केलें आहे की, ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळीं, म्हणजे यादवकाळांत, महाद्वारांत उभा राहिलेला अस्पृश्य विठ्ठलमूर्ति सहज पाही; इतकेंच नव्हे, तर त्यास त्या मूर्तीच्या स्वरूपाचा बारीकसारीक तपशीलहि दिसे. प्रा. माटे यांचा आणखी एक तर्क असा की, सध्याचें महाद्वार व त्याच्या आंतील नगारखान्याचा तळमजला म्हणजे पूर्वीचें देऊळ असावें. अर्थात् तें अगदी लहान असल्याने अस्पृश्यांस विठोबाचें दर्शन सहज व स्पष्ट होत असलें पाहिजे. प्रा. माटे यांच्या वरील अनुमानांविषयी आंम्हांस येथे कांहींच म्हणावयाचें नाही. परंतु त्याचें खंडन करतांना श्री. खरे यांनी जो मुद्दा पुढे केला आहे तो प्रस्तुत विषयाच्या दृष्टीने महत्त्वाचा वाटतो. अस्पृश्य संतांचीं वचनें वस्तुस्थितिनिदर्शक नाहीत, वगैरे सांगून श्री. खरे पुढे म्हणतात,[4] 'शिवाय पूर्वीचें देऊळ इतकें लहान होतें हें दाखवितां आलें पाहिजे. मला तर असें वाटतें की, पूर्वीचें देऊळ इतर मध्ययुगीन देवळांप्रमाणे गर्भगृह, शुकनासी, भोगमंडप, महामंडप, मुखमंडप इत्यादि विभागांचें असेल व त्यामुळे हल्लीप्रमाणे पूर्वींहि महाद्वार व विठोबा यांमध्ये २००-२५० फुटांचें अंतर सहज असेल.' वरील अनुमानांतून एक गोष्ट स्पष्ट होते. ती म्हणजे पूर्वीच्या 'लहान' देवळाच्या अस्तित्वाविषयी अनुमान व तें अस्तित्व सिद्ध करण्याची आवश्यकता. 'गॅझेटियर'कार व प्रा. माटे या दोघांच्याहि मतें असें एक लहान देऊळ पूर्वकाळीं असावें असें आहे, तर श्री. खरे असें देऊळ होतें हें दाखवितां आलें पाहिजे असें म्हणतात. एकूण सध्याच्या विठ्ठलमंदिराचा पूर्वावतार लघुस्वरूपांत किंवा कसाहि, अस्तित्वांत असला पाहिजे असें मानण्याकडे संशोधकांचा कल दिसतो. याविषयी निश्चितपणें कांहीं बोलण्यास साधनें किंवा पुरावा नाही असें म्हणून श्री. खरे येथेच थांबले आहेत.

१. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, पृ. ३०
२. Bombay Dist. Gaztt. Vol. XX, p. 431.
३. अस्पृश्यांचा प्रश्न, पृ. २१८-२२३.
४. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, पृ. ७४.

पंढरपूर येथील विठ्ठलमंदिराचा शके ११९० मधील शिलालेख ( पहिली बाजू )



अनुक्रमणिका

### एक नवोपलब्ध साधन

सुदैवाने अशा प्रकारचा पुरावा एका प्राचीन शिलालेखाच्या रूपाने अलीकडे उपलब्ध झाला आहे. हा लेख शके १११९ तील, म्हणजे 'चौऱ्यायशीच्या लेखा'हून सुमारें ८५ वर्षांपूर्वीचा असून तो मराठी भाषेंत आहे. अर्थात् पंढरपुरांतील सर्व उपलब्ध शिलालेखांत तो आद्य समजावा लागेल. हा लेख शोधून काढण्याच्या कामीं व त्याचे ठसे घेण्याच्या कामीं पंढरपूर येथील प्रसिद्ध नागरिक श्री. बाबूराव ( ग. वा. ) जोशी व तेथील संशोधन मंडळाचे सदस्य श्री. शंकरराव बडवे ( पाटील ) यांची फार मदत झाली हें येथे कृतज्ञतापूर्वक नमूद केलें पाहिजे. येथून पुढे या नवोपलब्ध शिलालेखाची माहिती दिली आहे. सोबत लेखाचे ठसेहि जोडले आहेत.

शके १११९ ] पंढरपूर शिलालेख, क्र. १ [ इ. स. ११८९

पाठ

१. [1]+ + + + + + सकु
२. सालवण [2] पुरि [3] १११० सौ
३. म्ये दिवा [4] शुक्रे सम
४. प्त चक्रवर्ति [5] । मा
५. हाजनिं । देवपरि
६. वारें । मुद्रहस्तें [6] विठ
७. लदेउनायकें [7] । भु
८. हि [8] आवघावें लान
९. मडु [9] ऐसा । कोठारि
१०. वाढासि [ वि ] जें [10] जाती वी
११. चारी चंद्रु न । हें क
१२. वणई । न ठावें । स
१३. प्र मुष्य [11] संप्रति
१४. कवणु अतिसो [12] देई तेआ
१५. सी वीठलाची आण

(१) पहिलीं चारपांच अक्षरें फार पुसट झाल्याने त्यांचें वाचन करणें अशक्य आहे. येथे बहुधा 'स्वस्ति श्री' असें असावें; (२) ∠ सं. शालिवाहन; (३) ∠ सं. सौर; (४) ∠ सं. दिव; (५) भिल्लम यादव, शके ११०९ ते १३; (६) हें व्यक्तिनाम पंढरपूर येथील शके ११९५ च्या 'चौऱ्यायशी लेखांत' तीन वेळां येतें : १-६, १-११, ३-२८; (७) नायकें असें वाचल्यास तृतीया व नायको असें वाचल्यास प्रथमा होते. 'विठलदेउनायको' हें प्रत्यक्ष देवाचेंच नांव असणेंहि शक्य आहे; (८) ∠ सं. भूयस्, क्रि. वि; (९) ∠ सं. मठ; हा शब्द देऊळ याच अर्थाने यादवकालीन महानुभावीय ग्रंथांत अनेकदा येतो. उदा० लीळा. पू. १, १३; पूजा. पृ. ६, १५; स्मृति. ६२, इत्यादि; (१०) 'वाढविजे' असें पाहिजे. 'वि'च्या ऐवजी 'सि' खोदण्यांत हस्तदोष आहे; (११) ∠ सं. मुख्य; (१२) ∠ सं. अतिशय; उदा० ज्ञा. १७. ४२८, ऋद्धि. ६३, उद्धव. ३०५.

१६. काजा जो फेडि
१७. विधात्रुद्रोहि लाहानु
१८. +[13] + + कर्मेठु[14]

### उपलब्धि व वर्णन

वरील शिलालेख पंढरपूर येथे श्रीविठ्ठलमंदिराच्या पश्चिम द्वारासमोरील सध्या 'बायकांची बारी' या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या भागांत उपलब्ध झाला. लेखाची शिळा तेथील मुतारीला पायरीप्रमाणे बसविलेली आढळली. हें कृत्य अर्थातच एखाद्या अलीकडील स्थापत्य-विशारदाचें असणार हें उघड आहे. कारण शिळा या कामासाठी नियोजित असावी असें तिच्यावरील खोदकाम पाहून वाटत नाही. सध्या ही शिळा पंढरपुरांतच नदीकाठीं असलेल्या सार्वजनिक वाचनालयांत आणून तेथे सुरक्षित ठेवण्यांत आली आहे. असो. या शिळेचा आकार खांबाप्रमाणे असून लेख शिळेच्या दोन बाजूंवर खोदलेला आहे. शिळा बरीच लांब असली तरी तिच्यावरील लेखांची लांबीरुंदी बेताचीच, म्हणजे एका बाजूवर १'--७॥"×१०" आणि दुसऱ्या बाजूवर १'–३"×१०" याप्रमाणे आहे. खोदकामाची खोलीहि विशेष नसून शिळेच्या सध्याच्या अवस्थेंत तरी लेख वरवर खोदल्याप्रमाणे दिसतो. कदाचित् लेखाची शिळा गेलीं अनेक शतकें उघड्यावर पडून राहिल्यामुळे तिच्यावरील खोदकाम पुसट झालें असावें. शिळेवर लेखारंभीं वा अन्यत्र कोठेहि चंद्रसूर्यांच्या किंवा इतर कोणत्याहि आकृति नाहीत. अर्थात् हा वीरगळ नाही हें स्पष्ट आहे. शिळेवरील लेखांतील ओळी एका बाजूवर १० व दुसऱ्या बाजूवर ८ याप्रमाणे एकूण १८ आहेत. पैकी पहिली ओळ फारच अस्पष्ट होऊन गेल्याने ती अनुमानानेच लावावी लागते. ओळींची लांबी फार थोडी असून प्रत्येक ओळींत साधारणपणें ७-८ अक्षरें आहेत. अक्षर मात्र आकाराने मोठे असून त्याची उंची कांही ठिकाणीं दीड इंचापर्यंत भरते. एकंदर खोदकाम अगदी साधारण प्रतीचें आहे.

### अक्षरवटिका, लेखनपद्धति आणि भाषा

शिलालेख देवनागरी लिपींत असून त्याची अक्षरवटिका यादवकालीन महाराष्ट्रांतील इतर लेखांतून आढळणाऱ्या वटिकेशीं जुळणारी आहे. पृष्ठमात्रेचा उपयोग कोठेहि केलेला नाही. परंतु पृष्ठमात्रा हें प्राचीनत्वाचें अनन्यसाधारण लक्षण नव्हे हें डॉ. रा. ग. हर्षे यांनी 'ज्ञानदेवी' च्या प्रस्तावनेंत दाखवून दिलेंच आहे. प्रस्तुत लेखांतील उ, ए, च, ज, ध, र आणि स या अक्षरांतील जुनें वळण स्पष्ट असून लेखाच्या प्राचीनत्वाचें तें द्योतक आहे. 'ई' या अक्षराचें प्राचीन वळण मात्र या लेखांत कोठे आढळत नाही. असो. लेखनपद्धतीचा विचार करतां अशुद्धता बरीच दिसून येते. वीचारी (१०–११), वीठलाची (१५), फेडि (१६), द्रोहि (१७) यांसारख्या कांही रूपांतून ऱ्हस्वदीर्घविषयक अनियमितता दिसते, तर वाढसि-[वि]जे (१०) या शब्दांत हस्तदोष आढळतो. लेखकाचा किंवा कोरक्याचा कल 'स'-काराच्या जागीं 'ष' कार कोरण्याकडे असावा असें लेखांतील षुरि (२), व समष्त (३-४) हीं दोन रूपें पाहून वाटतें. लेखांत बहुतेक सर्व ठिकाणीं विराम उभ्या दंडाने दर्शविला आहे. मात्र या बाबतींत युक्तायुक्तता पाळलेली दिसत नाही. कारण कांही ठिकाणचीं विरामचिन्हें अगदीच अस्थानीं वाटतात ( उदा. ओ. १२ ). तसेंच अनुस्वार देण्याच्या बाबतींतहि अनियमितपणा

(१३) अक्षरें अस्पष्ट आहेत; (१४) ∠ सं. कर्मस्थ=कर्मकारी.

दिसतो. वाढसिजं (१०), ठावें (१२) या शब्दांतील अनुस्वार अकारण आहेत. तसेंच विधालुद्रोहि (१७) या शब्दांतील अशुद्धलेखनहि स्पष्ट आहे. भाषेचा विचार करतां प्रस्तुत शिलालेख अथपासून इतिपर्यंत मराठी भाषेंत आहे हें त्याचें एक वैशिष्ट्य मानावें लागेल. भाषादृष्ट्या लेखांतील पुढील शब्दरूपें उल्लेखनीय असून तीं प्राचीनत्वाचीं द्योतक आहेत—

(पु.) प्र. ए. व. सकु (१); मडु (९); चंद्रु (११); कर्मटु (१८).
(पु.) द्वि. ए. व. अतिसो (१४).
(पु.) तृ. ए. व. देवपरिवारें (५-६); मुद्रहस्तें (६); विठलदेउनायकें (६-७).
(पु.) तृ. अ. व. माहाजनिं (४-५).
(पु.) स. ए. व. पुरि (२); दिवा (३).
(स्त्री.) प्र. ए. व. आण (१५).
(नपुं.) च. ए. व. काजा (१६)
सार्वनामिक रूपें : आवघावें (८); ऐसा (९); हें (११); कवणई (११–१२);
कवणु (१४); तेआसी (१४–१५); जो (१६).
क्रियापदिक रूपें : वाढवि [ त्रि ] जें (१०); ठावें (१२); देई (१४); फेडि (१६).

वरील रूपें यादवकालीन मराठी रूपांशीं जुळतीं आहेत. तात्पर्य, अक्षरवटिका, लेखनपद्धति आणि भाषा या तीनहि दृष्टींनी पाहिलें असतां प्रस्तुत लेखाचें प्राचीनत्व कळून येतें.

## कालनिश्चिति

या शिलालिखितांतील कालोल्लेख पहिल्या तीन ओळींत असून तो 'सकु सालवण पुरि १११० सौम्ये दिवा सुक्रे' याप्रमाणे आहे. म्हणजे संवत्सरनाम, शकाङ्क आणि वार इतक्या तीनच गोष्टी लेखांत उल्लेखित आहेत. मास, पक्ष, तिथि, नक्षत्र या बाबी अनुल्लेखित आहेत. तरी पण संवत्सरनाम व शकाङ्क यांचा निर्देश पुरेसा आहे. सालवण ( ∠ सं. शालिवाहन ) शकाच्या १११० वर्षी कीलक संवत्सर येतो, सौम्य येत नाही, असें पिले–जंत्रीवरून समजतें. सौम्य संवत्सर शके ११११ हा आहे. तेव्हा संवत्सर चालू व शकाङ्क गतशकाचा असा अनेक ताम्र–शिलालेखांतून आढळणारा प्रकार येथेहि आहे. 'दिवा सुक्रे' याहून दुसरा कोणताहि कालविषयक तपशील लेखांत नसल्याने कालनिश्चिति याहून अधिक स्पष्ट होणार नाही. सारांश, हा शिलालेख शके ११११ ( इ. स. ११८९ ) मध्ये खोदलेला असून पंढरपुरांत उपलब्ध झालेल्या सर्व लेखांत कालदृष्ट्या हा पहिला आहे. लेखांत राजवटीचा निर्देश नाही. परंतु भिल्लम यादवाच्या राजवटीचा काळ शके ११०९ ते १११३ असा असल्याने तो भिल्लमकालीन म्हणण्यास हरकत नाही.

## शिलालेखाचा आशय व चर्चा

या शिलालेखाचा अनुवाद पुढीलप्रमाणे करतां येईलः—"श्रीशालिवाहन सौर (गत) शक १११० ( या वर्षी ) सौम्य संवत्सरीं, शुक्रवार दिनीं समस्त चक्रवर्ती ( भिल्लम राज्य करीत असतांना ), महाजन, देवपरिवार ( म्ह. देवभक्तांचा समुदाय ), मुद्रहस्त विठ्ठल देवनायक, प्रभृति सर्वांनी ( हें ) लहान असें देऊळ ( स्थापिलें ). तें कोठाऱ्याने ( किंवा कोठारांतून ) वाढवावें ( म्ह. संभाळावें ). चंद्र कोणाची जात विचारीत नाही, हें कोणास ठाऊक नाही ? ( त्याप्रमाणें हें देऊळ लहान असलें तरी त्याचा प्रतिपाळ सर्वांनी करावा, असा

अभिप्राय ). सांप्रत ( या देवळाचे ) मुख्य सात ( जण ) आहेत. ( या देवळास ) कोणी अतिसो ( म्ह. पीडा, त्रास ) देईल त्यास विठ्ठलाची आण ( आहे ). ( हें ) कार्य जो फेडील ( म्ह. नष्ट करील ) तो विधातृद्रोही ( म्ह. ब्रह्मद्रोही ) व लहान ( म्ह. क्षुद्र ) असा कर्मठ ( म्ह. कर्म करणारा ) होय. ''

वरील आशय स्पष्ट आहे. मूळ शिलालेखांत विठ्ठलमंदिराचा स्पष्ट निर्देश नसला तरी लेखांतील ' लान मडु ' म्हणजे विठ्ठलाचें लहान देऊळ हें उघड आहे. कारण एक तर या शिलालेखापूर्वीचें म्हणजे शके १११० च्या पूर्वीचें विठ्ठलावाचून दुसरें एकादें प्रसिद्ध दैवत पंढरपुरीं असल्याचें इतिहासांत कोठे नमूद नाही. पंढरींतील इतर दैवतें विठ्ठलोत्तर काळांतील आहेत. याविषयी ' गॅझेटियर 'कार लिहितात—

'The statue of Vithoba Dr. Bhagwānlāl believes to belong to about the fifth century after Christ.' ( पृ. २७५ ). श्री. खरेहि पंढरीचें विठ्ठल हें दैवत ( मूर्ति नव्हे ) फार प्राचीन मानतात. या दृष्टीने विचार करतां त्यांनी उल्लेखिलेल्या शके ४३८ मधील ताम्रपटांतील[1] पाण्डरङ्गपल्ली, जयद्विठ, व पंडराधीशेन हे शब्द महत्त्वाचे वाटतात. दुसरें असें की, प्रस्तुत शिलालेखांत या देवळास जो कोणी पीडा देईल त्यास आण विठ्ठलाचीच घातली आहे. आता देऊळ एका दैवताचें आणि आण दुसऱ्या दैवताच्या नांवाने असें सहसा होणार नाही. अर्थात् ज्याचें देऊळ त्याचीच आण घातलेली आहे. यावरूनहि देऊळ विठ्ठलाचेंच होय हें सिद्ध होतें. याशिवाय कोणा ' विठलदेवनायका 'चाहि उल्लेख या लेखांत येतो ( ओ. ६-७ ). हें पद ' विठल-देउनायकें ' असें वाचल्यास तें व्यक्तिनाम होतें. पण त्याचें वाचन ' विठलदेउनायको ' असेंहि संभवतें, आणि तसें असल्यास हा उल्लेख प्रत्यक्ष विठ्ठल देवाचाच होऊं शकतो व त्यामुळे देऊळ विठ्ठलाचेंच या विधानास अधिक बळकटी येते. उरतां उरला मुद्दा देवळाच्या आकाराचा. प्रा. माटे यांची वर उल्लेखिलेली विचारसरणी मान्य केली तर पूर्वीचें विठ्ठलाचें देऊळ ' अगदी लहान, केवळ गर्भागारी (one-celled) ' होतें असें मानावें लागतें आणि चौंडरस या कन्नड कवीने वर्णिलेलें विठ्ठलमंदिर तर मोठें वाटतें; अतएव प्रा. माटे यांचा तर्क आणि तत्कालीन वस्तुस्थिति यांत विरोध उत्पन्न होतो, असें यावावत श्री. खरे यांचें म्हणणें आहे[2]; परंतु प्रस्तुत शिलालेखांतील ' लान मडु ' हें देवळाचें वर्णन प्रा. माटे यांच्या विचार-सरणीस पोषक ठरतें असें आम्हांस वाटतें. चौंडरसाचा काल श्री. खरे शके १२२५ च्या सुमाराचा मानतात.[3] शिलालेख शके ११११ मधील आहे. याचा अर्थ मूळचा ' लान मडु ' आणि चौंडरसाच्या वेळचें देऊळ यांत शेसवाशे वर्षांचें अंतर आहे. दरम्यानच्या काळांत शके ११९५ मध्ये देवळाचा जीर्णोद्धार म्हणा किंवा वाढ म्हणा, करण्यांत आली असें ' चौऱ्या-यशीचा लेख ' सांगतो. अर्थात् चौंडरसाच्या वेळचें विठ्ठलमंदिर प्रशस्त असल्यास त्यांत नवल नाही. ' पूर्वीचें देऊळ लहान होतें हें दाखवितां आलें पाहिजे ' हें श्री. खरे यांचें म्हणणें प्रस्तुत शिलालेख पूर्ण करीत आहे असें आम्हांस वाटतें. आतां मूळचा हा ' लान मडु ' नेमका कोठे होता, म्हणजे महाद्वारापाशी होता की सध्याचें मुख्य देऊळ जेथे आहे तेथेच होता, किंवा

१. Ind. Hist. Quarterly, Vol. XI, p. 769-778.

२. श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, पृ. ७४–७५.

३. सदर्हू, पृ. ३४.

आणखी कोठे होता, याविषयी मात्र निश्चयाने कांही सांगणें कठीण आहे. यासंबंधी दुसऱ्याचा तेवढा 'तर्क' आणि आपलें मात्र 'अनुमान' असें म्हणण्यास कोणालाहि जागा नाही. कारण, सर्वांचीं अनुमानेंच आहेत किंवा तर्कच आहेत. प्रत्यक्ष प्रमाण असें कोणीच देत नाही.

## समारोप

वरील विवेचनांतून जी फलनिष्पत्ति होते ती अनुमानांच्या रूपाने पुढीलप्रमाणे मांडतां येईल:—

१. पंढरपुरांत विठ्ठलभक्ति फार प्राचीन काळापासून (कदाचित् ६ व्या शतकापासून) चालू होती.

२. या विठ्ठलभक्तीस मूर्त स्वरूप १२ व्या शतकांत आलें.

३. तें ज्याच्यायोगे आलें तें विठ्ठलाचें देऊळ शके ११११ मध्ये स्थापन झालें. स्थापनेच्या वेळीं देऊळ अगदी लहान होतें.

४. हा 'लान मड्ड' हळूहळू वाढत गेला. शके ११५९ मध्ये त्यास होयसळ यादवांपैकी वीर सोमेश्वर याने कर्नाटकांतील एक गाव दान दिला. शके ११९२ मध्ये या देवळांत किंवा त्याच्या आवारांत आप्तोर्याम यज्ञ करण्यांत आला. शके ११९५ मध्ये 'पांढरीफडमुख्य, प्रौढप्रतापचक्रवर्ती' श्रीरामदेवराव यादव व त्याचा 'करणाधिप' हेमाडिपंडित यांनी पुढाकार घेऊन या देवळाची वाढ केली आणि देवस्थानाची त्याच्या कीर्तीस साजेल अशी व्यवस्था लावून दिली. देवळाचा विस्तार शके १२२५ च्या सुमारास पुष्कळच झाला आणि चौंडरस नांवाच्या तत्कालीन कन्नड कवीने त्याप्रमाणे त्याचें वर्णनहि केलें.

५. यानंतर लौकरच इस्लामच्या आक्रमणाचा घाला दक्षिणेवर पडला आणि पंढरपूरचें हें विठ्ठलमंदिरहि त्यांतून सुटूं शकलें नाही. मूळचा 'लान मड्ड' सध्याचें महाद्वाराजवळच कोठें तरी असावा. शके १२२५ पर्यंतची त्याची वाढहि त्याच ठिकाणीं झाली असावी. पुढे मात्र मुसलमानी अमदानींत या देवळाची एकसारखी पिछेहाट होत गेली आणि असें होतां होतां तें सध्या आहे त्या ठिकाणीं शिवकालांत स्थिरावलें.

६. शके ११९५ मधील 'चौऱ्यायशीच्या लेखा'स हें नांव कसें पडलें याविषयी आजवर अनेक तर्क करण्यांत आले आहेत. शके ११११ चा वरील शिलालेख या प्रश्नाचा उलगडा करण्यास मदत करतो. शके ११११ मध्यें विठ्ठलाचा 'लान मड्ड' स्थापना झाला व शके ११९५ मध्यें त्यास ८४ वर्षे पूर्ण झालीं. त्याप्रसंगीं जी शिळा खोदविण्यांत आली ती '८४ ची शिळा' म्हणून ओळखली जावी हें साहजिकच होय. कारण मूळच्या लहान देवळास ८३ वर्षे पूर्ण होऊन त्याची वाढ करण्यांत आल्याची ती द्योतक होती. विठ्ठलमंदिराचा तो ८४ वा वाढ दिवस होता व हें खोदकाम तत्प्रीत्यर्थ होतें.

वरील अनुमानें संशोधकांच्या विचारासाठी म्हणून नम्रभावाने पुढे केलीं आहेत.

● ● ●

५

# साहित्य-समीक्षा

## मराठी नाट्य-रचना

कै. श्री. विष्णु दत्तात्रेय साठे हे मराठी रंगभूमि व नाट्यसाहित्य यांचे एक निष्ठावंत उपासक व व्यासंगी विद्यार्थी होते. त्यांच्या अकालीं निधनामुळे या दोहोंचीहि फार मोठी हानि झाली आहे; पण त्यांच्या स्नेहीमंडळींनी आपल्या मित्रप्रेमाला जागून त्यांची स्मृति कायम ठेवण्यासाठी अपूर्व कामगिरी केली आहे. प्रस्तुत प्रकाशन हें तिचें दृश्य रूप होय. "हा ग्रंथ म्हणजे कै. वि. द. साठे यांच्या अत्यंत परिश्रमपूर्वक केलेल्या मराठी नाट्यासंबंधीच्या दीर्घ व्यासंगाचें फळ आहे. हें लिखाण मुख्यत्वेकरून १९४७ ते १९५० या कालावधींत लिहिलें गेलें. या लिखाणावर कांही संस्कार करून तें मुंबई विश्वविद्यालयाच्या पीएच्. डी. पदवीसाठी सादर करण्याचा कै. साठे यांचा मानस होता. हें काम करीत असतां त्यांचा अकालीं मृत्यु घडून आला व संस्करणाचें काम त्यांच्या हातून पुरें होऊं शकलें नाहीं" असें संपादकीय निवेदनांत नमूद करण्यांत आलें आहे.

"साठे यांच्या मनांत जे बदल अभिप्रेत होते ते करण्याचा संपादकांना अर्थात् अधिकार नाही" हें त्यांचें म्हणणें त्यांच्या नैतिक भूमिकेचें आणि श्री. साठे यांच्या लिखाणाबद्दलच्या आदराचें द्योतक आहे; व त्यांच्या या प्रामाणिक धोरणाबद्दल त्यांचें अभिनंदन करणें आवश्यक होय.

श्री. साठे यांच्या संपादक-स्नेह्यांनी ही आपली स्पृहणीय भूमिका प्रमाणाबाहेर ताणली नाही, हेंहि त्यांच्या औचित्यदृष्टीचें निदर्शक आहे. "पदवी परीक्षेसाठी लिहिलेल्या प्रबंधाचें सर्वसामान्य वाचकवर्गास, नाट्य-वाङ्मयाच्या अभ्यासकांस आणि नाट्य-रसिकांस उपयुक्त ठरेल अशा ग्रंथांत रूपांतर करीत असतां कांही बदल अपरिहार्य ठरतात" हा त्यांचा दावा कोणीहि अमान्य करूं शकणार नाही आणि "हें संस्करण कोणत्या मार्गांनी करावें, सध्याच्या मजकुरांत व योजनेंत कोणत्या तत्त्वानुसार बदल करावा ह्यासंबंधी तपशीलवार व सांगोपांग चर्चा साठे यांनी प्रा. ग. प्र. प्रधान व प्रा. अ. के. भागवत यांच्याशीं केली होती. या चर्चेचीं टिपणेंहि साठे यांच्या संग्रहांत आहेत. त्या टिपणांच्या अनुरोधाने मूळ मजकुराचें नवीन वर्गीकरण या ग्रंथांत केलेलें असून, कांही ठिकाणीं नवी रचना व क्रम लावण्यांत आला आहे. क्रम बदलतांना मजकुराची संगति जुळवून घेण्यासाठी एखादुसरें वाक्य वा वाक्यार्थ एवढाच स्वतःच्या पदरचा असा घातला आहे" अशी त्यांच्याकडून ग्वाही मिळालेली असल्यावर तर नाहीच नाही. मूळ प्रबंधाचें, 'मराठी नाट्यसंविधानक : तंत्र व विकास' हें शीर्षक बदलून

मराठी नाट्यरचना : तंत्र आणि विकास—[लेखक: वि. द. साठे; प्रकाशक :—श्री. के. वा. भोळे, अध्यक्ष वि. द. साठे, स्मारक-समिति C/o व्हीनस बुक्-स्टॉल, पुणें २. मूल्य ८ रुपये.]

त्यास ' मराठी नाट्यरचना : तंत्र आणि विकास ' हें नवें शीर्षक देण्यांतहि श्री. साठे यांच्या संपादक-स्नेह्यांनी योग्य तेंच केलें आहे. श्री. साठे यांच्या या ग्रंथाचीं क्राऊन आकाराचीं साडे-चारशे पृष्ठें असून त्याच्या शेवटीं दहा पानांची संदर्भ-सूची जोडलेली आहे. यावरून त्याचा व्याप आणि विस्तार केवढा अवाढव्य आहे हें अगदी जातां जातां पाहणारालाहि समजून येईल. " केवळ मराठी नाट्यरचनेचा इतिहास व तंत्रदृष्ट्या तपशील देणारा असा स्वतंत्र ग्रंथ यापूर्वी मराठींत लिहिला गेलेला नाही. एतद्विषयक जे कांही थोडे चर्चात्मक लेख आहेत ते अत्यंत स्फुट स्वरूपांत व मर्यादित कालावधिनिष्ठ आहेत. अशा लेखांचा योग्य तो संदर्भ प्रस्तुत प्रबंधाच्या लेखनांत आलेला आहेच " असा श्री. साठे यांनी आपल्या ग्रंथाच्या स्वरूपाबद्दल आपल्या प्रास्ताविकांत निर्वाळा दिला आहे. त्यावरून या ग्रंथाचें अपूर्वत्व व महत्त्व ध्यानीं येण्यासारखें आहे. श्री. साठे यांच्या प्रतिज्ञेनुसार, नाट्यनिर्मितीची क्रिया, तिचें फलित जी नाट्यवस्तु तिची रचना व संविधानक या अंगांनी विचार, आणि यांची तंत्रद्वारा रसिकांसमोर अभिव्यक्ति याबद्दलची चर्चा हा या ग्रंथाचा विषय असून, " नाट्यरचनेंतील मुख्यतः बाह्य-प्रकृतिनिष्ठ ( Formal ) तंत्रांगांची तपशीलवार चर्चा या ग्रंथांत केलेली आढळते " असें या ग्रंथाचे संपादक सांगतात व त्याबरोबरच " परंतु लेखकाचे सर्व नवीन विचार यांत आले आहेत असें नाही " अशी ते पुस्तीहि जोडतात. अशी स्थिति असल्यामुळे प्रस्तुत ग्रंथाचें परीक्षण करणें हें कांहीसें नाजूक काम आहे; परंतु त्याहि बाबतींत संपादकांनी स्वतःच या ग्रंथाचें प्रयोजन काय असूं शकेल याची दिशा दाखवून दिली असल्यामुळे, तें कांहीसें कमी जबाब-दारीचें झालें आहे. ते लिहितात, " व्यापक भूमिकेवरून नाट्यरचना, संविधानक आणि त्यांचें परस्पर नातें यांचा अभ्यास करणाऱ्यांना प्रस्तुत ग्रंथ उपयुक्त आणि सूचक ( Suggestive ) ठरावा अशी आमची कल्पना आहे....या पूर्वतयारीनंतर श्री. साठे यांच्या विचारांची प्रगति होत होती हें निश्चित; पण त्यांची परिणति नेमकी कशी झाली असती, याबद्दल अनुमानें काढण्याचें हें स्थळ नव्हे." तेव्हा मराठी नाट्यरचनेचा इतिहास व तंत्रदृष्ट्या तपशील—आणि तोहि " मुख्यतः बाह्यप्रकृतिनिष्ठ ( Formal ) तंत्रांगांचा "—देणारा आणि अभ्यास-कांना " उपयुक्त व सूचक ( Suggestive ) ठरावा असा " हा ग्रंथ आहे. लेखक व संपादक यांची त्याबद्दलची अपेक्षा पूर्णपणें सफल झालेली आहे यांत संशय नाही.

परंतु यापेक्षा अधिक मूलगामी विचारांची किंवा औपपत्तिक निगमनांची अपेक्षा करून कोणी या ग्रंथाचें परिशीलन करूं लागेल तर त्याच्या पदरीं निराशाच पडेल. पण तो दोष लेखकाचा नसून तशी अपेक्षा बाळगणाऱ्या वाचकाचा म्हणावा लागेल, हें वर उद्धृत केलेल्या वाक्यांवरून उघड आहे. तशा प्रकारची चर्चा आणि सिद्धान्त-मंडन या ग्रंथांत अंतर्भूत झालें असतें, तर ग्रंथाची योग्यता व थोरवी अनेक पटींनी वाढली असती, यांत संशय नाही; पण तसें घडलेलें नाही याची जाणीव संपादकांना आहे व ग्रंथकारालाहि असावी असें संपादकीय निवेदनावरून उघड दिसतें. ग्रंथकाराच्या अकालीं मृत्यूच्या दुर्दैवी घटनेमुळे आवां हा ग्रंथ आहे त्या स्वरूपांतच मान्य करून घेणें प्राप्त आहे; व त्या दृष्टीने त्याची जी योग्यता व उपयुक्तता आहे ती ध्यानीं घेऊन ग्रंथकर्त्याला त्याचें श्रेय आणि धन्यवाद देणें हें मराठी भाषकांचें व नाट्यप्रेमिकांचें कर्तव्य होय.

औपपत्तिक निगमन आणि मूलगामी तत्त्वचर्चा या दृष्टींनी नाट्यलेखन व नाट्य-प्रयोग यांबद्दलच्या विचारांत फारशी महत्त्वाची भर या ग्रंथाने टाकली नसली तरी मराठी नाटकें व मराठी रंगभूमि यांच्याबद्दलच्या पुष्कळशा उपयुक्त माहितीचें संकलन व परीक्षण

त्यांत झालें आहे. श्री. साठे यांच्या याबाबतच्या परिश्रमांचें प्रत्यंतर वाचकांना पानोपानीं पाहावयाला मिळतें. अस्सल दस्तैवजापासून तों सांगोवांगीच्या दंतकथापर्यंतचा सर्व प्रकारचा मालमसाला या ग्रंथांत सर्वत्र विखुरलेला आढळतो. यामुळे पुस्तक कोठेहि उघडलें तरी कांहीतरी मनोरंजक आणि उद्‌बोधक असें तेथे त्यास सापडल्यावाचून राहत नाही. ' युद्धस्य वार्ता रम्या ' ही उक्ति आता जुनी झाली असून, युद्धाच्या बातम्यांपेक्षाहि नाट्यविषयक आख्यायिका व चुटके यांची लोकप्रियता त्याहून कितीतरी पटीनें वाढली आहे. या वृत्तीने नाटक व रंगभूमि यांच्याबद्दल कुतूहल वाटणाऱ्या वाचकांना हा ग्रंथ अत्यंत मनोरंजक वाटेल असाच आहे. इतिहासाच्या कल्पनेने नाटककार व नट यांच्या जीवनाबद्दल व कार्याबद्दलच्या आख्यायिकांविषयी जिज्ञासा असणाऱ्यांना त्यांत भरपूर खाद्य मिळेल; आणि नांवें, तारखा, सन, घटना यांच्या माहितीच्या याद्या म्हणजे ज्ञान अशी ज्यांची समजूत असेल त्यांना तर हा प्रबंध म्हणजे एक बहुमोल संदर्भग्रंथच उपलब्ध झाल्याचा आनंद होईल. लोकप्रिय वर्तमानपत्रांबद्दल त्यांत प्रत्येकाला स्वतःला आवडेल असें कांहीतरी मिळतें असें सांगतात. या ग्रंथाबद्दलहि तसेंच म्हणतां येईल. रंगभूमि व नाटक यांबद्दल आस्था वाटणाऱ्या प्रत्येक माणसाला यांत, त्याला आवडेल असें कांहीतरी नक्की सापडेल. पूर्वी मराठींत संसारचोपडी नांवाची व्यावहारिक ज्ञान, मनोरंजन, वैद्यकीय ज्ञान, नित्योपयोगी माहिती, ज्योतिष वगैरे अनेक विषयांबद्दल थोडक्यांत उद्‌बोधक, महत्त्वाची व उपयुक्त माहिती देणारीं पुस्तकें प्रसिद्ध होत असत. प्रस्तुत ग्रंथ हा नाट्यलेखन व नाट्यनिर्मिति यांची अभिजात संसारचोपडी आहे आणि म्हणूनच प्रत्येक नाट्यभक्ताने त्याचा संग्रह करणें अत्यंत आवश्यक आणि उपयुक्त आहे.

सर्वसाधारण नाट्यप्रेमी वाचकांबरोबरच शालेय परीक्षांच्या दृष्टीने नाट्यवाङ्मय व रंगभूमि यांचा अभ्यास करणाऱ्यांनाहि हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त ठरल्यावाचून राहणार नाही. या विषयावर आतापर्यंत जें लिहिलें गेलें आहे त्याचा श्री. साठे यांनी परिश्रमपूर्वक समाचार घेतला असून, बऱ्याच जागीं त्यांतील महत्त्वाच्या भागांचे विस्तृत उतारे घेतले आहेत. यामुळे एका पुस्तकाच्या वाचनाने चलाख विद्यार्थ्याला बहुश्रुतपणाचें श्रेय सहज संपादन करतां येण्यासारखें आहे. "नाट्यवस्तु-निर्मितीची पार्श्वभूमि", "नाट्यवस्तूचा संकोच—एकांकिका", " प्रायोगिक मूल्य " हीं व परिशिष्टांतील सर्वच प्रकरणें, सर्वसाधारण रसिक व नाट्याचे हौशी विद्यार्थी, यांना मनोरंजक व उद्‌बोधक वाटतील यांत शंका नाही.

दुर्दैवाने श्री. साठे अकालीं कालवश झाले, ते न होते तर हा ग्रंथ कदाचित् यापेक्षा अगदी वेगळ्या स्वरूपांत प्रकाशित झालेला दिसला असता; पण योगायोग तसा नव्हता; परंतु त्यांनी परिश्रमपूर्वक जी तयारी केली, तिला ग्रंथरूपाने प्रकाशांत आणून श्री. साठे यांच्या स्नेह्यांनी केवळ मित्रऋणच फेडलें नसून, मराठी नाट्यलेखन व रंगभूमि यांचीहि त्यांनी फार मोठी सेवा केली आहे. त्यांच्या या संस्मरणीय कामगिरीबद्दल त्यांचें अभिनंदन करून आणि कै. श्री. साठे यांच्या या ग्रंथरूप स्मृतीला अभिवादन करून हें परीक्षण पुरें करतों. ● ● ●

के. नारायण काळे

अनुक्रमणिका

## राष्ट्रपिता महात्मा गांधी

महात्मा गांधी यांच्या हयातींतच त्यांचीं अनेक छोटीं-मोटीं चरित्रें अनेक भाषांत झालीं. त्यांनी स्वतः 'सत्याचे प्रयोग' या नांवाखाली आत्मचरित्र लिहिलें आणि त्यांचींहि भाषांतरें कित्येक भाषांत झालीं. गांधीजी, त्यांच्या चळवळी, त्यांनी शिकवणूक यांबद्दल त्यांनी स्वतः व इतरांनी इतके लिहिलेलें आहे की, त्यांची मोजदाद करणें देखील मुश्किलीचें आहे. सुमारें वीस वर्षांपूर्वी एका अमेरिकन लेखकाने असा हिशेब दिला होता की, केवळ इंग्रजी भाषेंत सहा हजार मिलिअन म्हणजे आपल्या गणनापद्धतीने सहा खर्व शब्द गांधीजींबद्दल लिहिले गेले. आतापर्यंत त्यांची तिप्पटचौपट झाली असेल असें खुशाल समजावें.

मराठींतहि गांधीजींबद्दल प्रसिद्ध झालेलें वाङ्मय पुष्कळ आहे. गांधीजींचें पहिलें मराठींतील चरित्र बहुधा कै. सौ. अवंतिकाबाई गोखले यांनीच लिहिलें असावें. १९१८ सालीं प्रसिद्ध झालेल्या या पुस्तकाला लोकमान्य टिळकांनी विलायतेस जाण्याच्या गडबडींत असतांहि एक विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. गांधींचें हिंदुस्तानांतील चरित्र यापुढेच खरोखर घडावयाचें होतें. परंतु जें कांही हिंदुस्थानांत आल्यानंतरच्या तीन वर्षांत व त्यापूर्वीं दक्षिण आफ्रिकेंत गांधीजींनीं केलें होतें त्याचें बरोबर मोजमाप टिळकांपाशीं होतें त्याचा उल्लेख करून टिळकांनी लिहिलें, " गांधी यांनी स्वीकारलेला निःशस्त्र प्रतिकाराचा, अडवणुकीचा किंवा त्यांच्या भाषेंत बोलावयाचें तर सत्याग्रहाचा मार्ग त्यांना सुचलेला असून, त्यांनी अनेक अडचणी सोसून त्या मार्गाचा अवलंब केला असल्यामुळे तो आता शास्त्रपूत झाला आहे. " टिळक व गांधी यांच्यातील विरोध मूलभूत व समन्वय करण्यापलीकडचा होता असें मानणाऱ्यांनी ही प्रस्तावना जरूर नजरेखाली घालावी. असो.

या गोखलेबाईंच्या चरित्राशिवाय १९२४ सालीं कै. सीतारामपंत दामले व 'सीताकांत' यांचीं दोन चरित्रें प्रसिद्ध झालीं. हीं दोनहि मुख्यतः कथनपर अशींच आहेत. 'सीताकांत' यांच्या चरित्राला श्री. मुकुंदराव जयकर यांची एक तीन-पानी प्रस्तावना आहे व तीमुळे आपल्या पुस्तकाला शोभा आली आहे असें लेखकाने म्हटलें आहे. यानंतरचें माझ्या पाहण्यांत आलेलें उल्लेख करण्यासारखें पुस्तक म्हणजे श्री. हरि गणेश फाटक यांचें. हेंहि कथनपरच आहे. परंतु त्याला लिहिलेली कै. शंकरराव जावडेकर यांची लहानशी दोन-पानी प्रस्तावना मोठी ठसठशीत व दूरदृष्टीची द्योतक आहे. १९३९ सालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या या प्रस्तावनेंत जावडेकर म्हणतात, " महात्मा गांधी ही एक आजच्या जगांतील अद्वितीय व सर्वश्रेष्ठ विभूति आहे; हिंदु संस्कृतीचें तें अत्यंत परिणत फल आहे. भारतीय संस्कृतीची ही जगाला बहुमोल देणगी आहे. श्रीकृष्ण व गौतमबुद्ध यांच्या तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व त्यांनी आत्मसात् केलेलें आहे. युरोपीय संस्कृतीचें आसुरी स्वरूप त्यांनी जितकें ओळखिलें आहे तितकें कोणींहि ओळखिलेलें नसून तिचा अंतहि त्यांना सर्वांआधी दिसलेला आहे. गेल्या महायुद्धापूर्वीं ( म्हणजे इ. स. १९१४-१८ ) सुमारें अर्धें तप तरी त्यांनी या आधुनिक संस्कृतीचा अंत आपल्या प्रज्ञाचक्षूंनी पाहिला होता आणि मानवसंस्कृतीची पुनर्घटना करण्याचें सामर्थ्य आपल्या सत्याग्रहांत आहे असा संदेश १९०९ सालींच त्यांनी राष्ट्रीय सभेला ( लाहोरची बैठक ) पाठविला होता.

यानंतरचें 'गांधीदर्शन' या नांवाचें अनाथविद्यार्थिगृहाने प्रकाशित केलेलें श्री. पां.

राष्ट्रपिता महात्मा गांधी—[लेखक : वामन गोपाळ जोशी व नारायण रामकृष्ण अभ्यंकर; प्रकाशकः—नारायण रामकृष्ण अभ्यंकर, १४ नावलकर बिल्डिंग, खाडिलकर रस्ता, मुंबई ४. किंमत १५ रुपये. ]

श्री. आपटे यांचें एक चटकदार चरित्र आहे. पद्मप्रकाशनाचें ' गांधीजींच्या सान्निध्यांत ' हें पुस्तक, प्रस्तावनाकार श्री. काकासाहेब कालेलकरांच्या शब्दांत 'सोप्या, रोचक व बागडणाऱ्या' भाषेंत श्री. प्रभाकर दिवाण यांनी लिहिलेलें आहे. गांधीजींच्या व्यक्तित्वाची ओळख पटण्याला तें फार उपयुक्त आहे यांत शंका नाही. हीं दोन पुस्तकें १९४८ व १९४६ सालीं प्रकाशित झाली आहेत. परंतु या दोन पुस्तकांपूर्वीं १९४४ सालीं, सकाळ प्रकाशनसंस्थेतर्फे श्री. दा. न शिखरे यांनी एक विस्तृत गांधीचरित्र बऱ्याच मेहनतीने व कसोशीने लिहून, पुष्कळच तपशीलवार मजकूर वाचकांना पुरविला आहे. मराठींतून गांधीचरित्राची पक्की ओळख करून घेण्याला हें पुस्तक वाचणें अवश्य ठरेल. त्यांतील शेवटचें प्रकरण ' तात्त्विक समारोप ' या नांवाचें आहे. त्यांत समारोप उत्तम आहे पण तत्त्वचर्चा थोडी आहे. पुस्तक प्रसिद्ध झाल्याला आता बारा वर्षें झालीं. या मुदतींत गांधीजीवनसंदेशाचें अधिक मनन शिखरे यांनी सहजच केलेलें असेल आणि हें समारोपाचें प्रकरण पुनः लिहिण्याचा सुयोग आला तर तें अधिक समर्थपणें लिहितील असा विश्वास वाटतो.

परंतु शिखरे यांच्या तात्त्विक समारोपांत नसलेली तत्त्वचर्चा 'राष्ट्रपिता महात्मा गांधी' या आपल्या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत वीर वामनराव जोशी यांनी मोठ्या उत्कटतेने, ठाशीवपणें व निश्चयात्मक भाषेंत करून महात्मा गांधींचें दुर्निरीक्ष्य सद्यःपरिस्थितींत नेमकें स्थान काय हें दाखवून दिलेलें आहे. या प्रस्तावनेची भाषा त्यामुळेच मोठी आश्वासक, वक्तृत्वपूर्ण आणि स्वाभाविक अशी पडली आहे. या पुस्तकाचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे ही प्रस्तावनाच. बाकी पुस्तकाची पावणेआठशे पानें म्हणजे गांधीचरित्रांतील संगतवार, वर्षानुक्रमाने घडलेल्या सर्व महत्त्वाच्या घटनांची नोंद आहे. शक्य तितक्या सर्व हकीगती गांधीजींच्याच शब्दांत दिलेल्या आहेत. त्यामुळे त्यांना अस्सल कागदपत्रांचें महत्त्व आहे. या बाबतींत चरित्रलेखकांनी म्हणजे प्रायः श्री. अभ्यंकरांनी ' महात्मा ' या नांवाने आठ ग्रंथांमध्ये इंग्रजींत प्रसिद्ध झालेल्या श्री. तेंडूलकरांच्या चरित्राचें अनुकरण निष्ठापूर्वक केलें आहे. मराठींत एकत्र हा सगळा मजकूर वाचण्यास मिळतो हा मात्र मोठा लाभ आहे.

प्रस्तावनेची भाषा कशी खणखणीत आहे याचा एक नमुना पाहा. " अंगांत हिंसेचें पुरेपूर सामर्थ्य असतांहि सत्य व अहिंसा या व्रतांचें पालन करणें हाच खरा पुरुषार्थ आहे असें महात्माजींचें निश्चित मत होतें आणि म्हणूनच महायुद्धाच्या वेळीं हिटलर व ब्रिटिश यांना त्यांनी आपल्या ' अहिंसात्मक सत्याग्रहा 'चा उपदेश करण्याचें साहस केलें होतें. परंतु हिटलरला त्यांनी लिहिलेलें उपदेशपत्र सरकारने त्याला मिळूंच दिलें नाही आणि ब्रिटिशांना उद्देशून त्यांनी लिहिलेल्या पत्राकडे ब्रिटिशांनी लक्ष दिलें नाही. तसें करण्यास त्यांना योग्य कारण होतें असें मानण्यास हरकत नाही. तथापि त्याच्या परिणामीं दुसऱ्या महायुद्धाच्या भयानक अग्निकुंडांत अनेक राष्ट्रें जाळूनपोळून निघालीं आणि मनुष्यजातीचे अतोनात हाल झाले. त्यांत कांही नवलहि नाही. अहिंसात्मक सत्याग्रह करण्याचें सामर्थ्य शस्त्रास्त्रसंपन्न बलाढ्य राष्ट्रांना एका रात्रींत प्राप्त होणें अशक्यच होतें. परस्परांतील झगडे मिटविण्याचा रक्तपातमय घोर संग्राम हाच एक अंतिम मार्ग आहे, हाच एक सिद्धान्त त्यावेळेपर्यंत जगांतील सर्व राष्ट्रांना पाठ झालेला होता. तेव्हा त्या सिद्धान्तापासून एक तसूभरहि ढळणें त्यांना शक्य नव्हतें आणि महात्मा गांधींच्या या अभूतपूर्व सिद्धान्ताचा ज्ञानपूर्वक व श्रद्धापूर्वक बराच काल अभ्यास केल्यावाचून यापुढेहि त्या जुन्या सिद्धान्ताच्या मगरमिठींतून आपली सुटका करून घेणें मानवाला अशक्यच आहे."

प्रस्तावनेंतील आणखीहि एक खणखणीत वाक्य पाहा. " हिन्दुस्थान अस्तेयधर्माच्या अखंड पालनाने पवित्र व बलसंपन्न झाल्यावाचून जगास मार्गदर्शन करण्याला समर्थ व पात्र होईल असें आम्हांस मुळीच वाटत नाही. तेव्हा भारतांतील ज्ञानसंपन्न, बुद्धिमान्, धनवान् प्रबलांनी आपल्या ज्ञानाचा, बुद्धीचा व धनाचा समाजांतील दुर्बलांचें दुर्बलत्व निवारण करण्याच्या कामीं उपयोग करणें हें त्यांचें आद्यकर्तव्य आहे व हें जाणून त्यांनी आपलें आचरण यापुढे ठेविलें पाहिजे. देशांतील प्रबलांची आचारशुद्धि झाल्यावाचून त्यांचें स्वतःचें सामर्थ्यच काय, पण प्रत्यक्ष अस्तित्वसुद्धा सुरक्षित राहूं शकत नाही आणि देशांत शांतता नांदून देशाच्या सर्वोदयाचा मार्ग मोकळा होत नाही. हा इतिहासाने शिकविलेला धडा विसरून जाणें सर्व-प्रकारे हानिकारक आहे हें आपण लक्षांत बाळगिलें पाहिजे. "

आतापर्यंत प्रसिद्ध झालेलीं गांधीचरित्रें आणि हें ' राष्ट्रपिता महात्मा गांधी ' नांवाचें चरित्र यांमधील मुख्य फरक हा की, पूर्वीचीं चरित्रें अवतारसमाप्ति होण्याच्या पूर्वीचीं आहेत व हें चरित्र त्यांच्या समग्र जीवनाचें परिशीलन आहे. गांधीजींच्या जीवनाचा सगळा पट हें चरित्र वाचकांसमोर उघडून दाखवितें. या पुस्तकाला सूची नाही ही एक इतक्या उपयुक्त पुस्तकाची उणीवच समजली पाहिजे. केवळ मराठी वाचकांना हें पुस्तक अवश्य संग्राह्य आहे.

● ● ●

## स्वातंत्र्यवीरांचें सागरदिव्य

श्री. शिवरामपंत करंदीकरांनी सावरकरांचें विस्तृत चरित्र लिहिलें आहे. त्यामध्ये त्यांनी मार्सेलिस-प्रकरणाचा साद्यंत इतिहास ' त्रिखंडांत गाजलेली उडी ' या शीर्षकाखाली अतिशय परिणामकारकतेने ग्रथित केला आहे. इतका सुंदर, प्रभावी ग्रंथ उपलब्ध असतांना पुन्हा त्याचें रूपांतर पद्यांत करण्याचा खटाटोप कवीने कां केला, अशी शंका कदाचित् गद्याच्या अभि-मान्यांना येण्याची शक्यता आहे. परन्तु या शंकेचें उत्तर त्यांना हें काव्य वाचूनच मिळण्या-सारखें असल्याने हें काव्य त्यांनी प्रथम वाचावें इतकीच भलावणी करून प्रस्तुत काव्याकडे वळूं.

चरित्रग्रंथामध्ये घटनांना ऐतिहासिक महत्त्व असतें. परंतु कवि जेव्हा आपल्या वर्ण्य व्यक्तीच्या जीवनांतील एखाद्या घटनेचें चित्रण करतो तेव्हा त्या घटनेचें, घटनात्व नाहीसें होऊन तिला भावनेचा, आत्मीयतेचा आणि गौरवाचा एक नवाच साज चढतो. काव्यांचा नायक हा विनायक आहे. भारताची वंदनीय राष्ट्रविभूति आहे. पराक्रमाचें कौतुक आणि पराक्रमाची पूजा करणें हा मानवी मनाचाच धर्म आहे व त्यांत पुन्हा तो पराक्रम किंवा त्याग मानव-जातीच्या हितार्थ असेल तर मग त्याचा गौरव युगेंन् युगें मानवजाति प्रेमाने करीत आली आहे. ' सावरकर ' या नांवाभोवती साहसाचें, पराक्रमाचें, असीम त्यागाचें व धारदार बुद्धिमत्तेचें असें कांहीएक दिव्य प्रभावलय निर्माण झालें आहे की, पौराणिक कालांतील रामकृष्णांनंतर व ऐतिहासिक कालांतील राणाप्रताप वा शिवाजीनंतर, अर्वाचीन कालांत महा-काव्याचा विषय होण्याचा मान ज्या कांही थोडया विभूतींना दिला जाईल त्यांत सावरकरांचा क्रमांक फारच वरचा लागेल हें निर्विवाद !

स्वातंत्र्यवीरांचें सागरदिव्य —[खण्डकाव्य. कवि : डॉ. ल. शं. भात्रे, प्रकाशक : इनामदारबंधु, ९९१ सदाशिव पेठ, पुणें २. मूल्य १ रु. ]

भाव्यांच्या काव्याचा महत्त्वाचा विशेष म्हणजे तें सोपें आणि म्हणूनच सुंदर वठलेलें आहे. मोरोपंती आर्येचा जरी त्यांनी उपयोग केलेला असला तरी तींतील क्लिष्टता त्यांत नाही, जुनें कीर्तनकारी वळण नाही. कथनाचें अगदी अद्ययावत् तंत्रहि भाव्यांनी वापरल्याचें दिसून येईल. स्वातंत्र्याच्या आद्य ऋषीने–लोकमान्यांनी–स्वातंत्र्याचा ' हरि ॐ ' जपून जी शक्ति मंत्रून शत्रूच्या मर्मस्थानीं फेकली ती म्हणजेच सावरकर ही कल्पना फारच प्रभावी-पणें भाव्यांनी पुढील आर्येत आणिली आहे—

प्रत्यक्ष लोकमान्यें करुनि पुरस्कार अग्निमय वाणा ।
मर्मींच इंग्रजांच्या क्षेपियलें तळपत्या नव्या तरुणा ॥

शिवाजी-शिष्यवृत्ति सावरकरांना मिळावी म्हणून पं. श्यामजी कृष्णवर्मांना टिळकांनी जें सावरकरांविषयी शिफारसपत्र लिहिलें त्या ऐतिहासिक घटनेचें इतकें थोडक्यांत पण सूचक नि ओजस्वी वर्णन केवळ काव्यांतच होऊं शकतें हा विचार गद्याच्या अभिमान्यांना चाटून गेल्यावाचून राहणार नाही ! भाव्यांच्या काव्यांत आणखी एक विशेष दिसून येतो तो हा की, प्रसंगाच्या दिग्दर्शनार्थ जेथे जेथे त्यांनी पौराणिक दाखले व दृष्टान्त दिले आहेत तेथे तेथे त्याचबरोबर ज्ञात ऐतिहासिक काळांतील एखादा समर्पक दृष्टान्त त्यांनी जोडून दिलेला आहे; आणि म्हणूनच हत्तीची शुंडा पिळणाऱ्या येसाजीचा वा रणांत उडी घेणाऱ्या पानिपतच्या भाऊंचा उल्लेख काव्याला एक नवीनच आपलेपणा आणून देतो. मात्र भाव्यांना या संदर्भात शिवरायांच्या आग्ऱ्याहूनच्या सुटकेचें कसें विस्मरण झालें याचें आश्चर्य वाटतें. भाव्यांनी सावरकरांच्या कांही कवितांचा मधून मधून आर्याछंदांत थोड-क्यांत पण सुंदर अनुवाद केलेला आहे. ' फेअरवेल ' ( शेवटचा रामराम ) या सावरकर-रचित इंग्रजी कविताबद्ध पत्राचें केवळ गद्य मराठी भाषांतरच प्रचलित आहे. काव्यप्रतिभा व देशभक्ति यांचा इतका दुर्मिळ संगम अन्यत्र सावरकर-वाङ्मयांत सापडणार नाही अशी ग्वाही कै. न. चिं. केळकरांनीच देऊन ठेविली आहे. भाव्यांनी हें सर्व भाषांतर इतकें सुंदर केलें आहे की, पाठांतरांत मुलांना तें देण्याची नवीन सोय त्यांनी करून ठेविली आहे.

इतिहास रंगभूमी अतुट तिथें नट असंख्य आपणची ।
प्रेक्षक मानवजाती स्तवितिल पाहूनि भूमिका अमुची ॥१०२॥

देशभक्तीचा उदात्त आदर्श या ओळींच्या पठनाने नवयुवकांत अवश्य निर्माण होईल.

भाव्यांची भाषा सोपी असली तरी योग्य ठिकाणीं अशी कांही प्रभावी रूप धारण करते याचें एक उदाहरण पुढील आर्येत पाहावें—

तो फाशिचा फळा जो सत्संगाने पवित्रतम झाला ।
कितिदा गणती नाही, वीरात्म्यांनी स्वलोहितें धुतला ॥८८॥

कथाकाव्यांत जिवंतपणा निर्माण करण्यासाठी नाट्यपूर्ण संवादाची योजना जुन्या-नव्या सर्वच कवींनी केलेली आहे. परंतु भाव्यांनी अमानवी तत्त्वांना सजीव करून कथा-नकांत जी एक कुतूहलपूर्ण नाट्यमयता निर्माण केलेली आहे ती त्यांच्या काव्यप्रतिभेची साक्ष देण्यास पुरेशी आहे. सागर व सागरनौका यांतील पुढील सूचक संवाद आपण ऐकूं—

गप्पांत रमत सागर, सागरतरि शांततेंत रात्रीच्या ।
" अरि हा सम्राटाचा, पाळत ठेवूं कृतीवरी त्याच्या ॥ १३२ ॥
पाहूं कसा सुटे तो झडपिन मी त्यास थंडलाटांनीं । "
नाव वदे " मी भोंगा धोक्याचा गर्जवीन घनगगनीं " ॥ १३३ ॥

ऐसे बोलुनि हसली रेंदाळुनि लाट फेकुनी वरती ।
नावेस देइ टाळिच, सागर लहरींकरीं करी गमती ॥१३४॥

सावरकरांच्या इच्छाशक्तीवर आधारलेली अतिशयोक्ति यथोचीत वाटावी अशा कौश-ल्याने कवीने जी पुढील घटना वर्णिली आहे ती त्याच्याच शब्दांत पाहूं—

सावरकरमनवादळ नाव जणूं फ्रेंचभूकडे ढकली ।
झुकलि खरोखर तिकडे, जागा शंकेस ना मुळीं उरली ॥१४२॥

सावरकरांनी बोटींतून उडी टाकून सुटका करून घेतल्यावर जी एकच धांदल, घबराट व कल्लोळ तेथे उडाला त्याचें हें मार्मिक वर्णन पाहा—

आज्ञा तडाड सुटल्या, धोक्याचा गर्जु लागला भोंगा ।
कैसा पकडावा हा पोखरि गर्वास आज जो भुंगा ॥१४३॥

करुणभावाचा सुंदर शिडकावहि भाव्यांनी अत्यंत हळुवारपणें योग्य ठिकाणीं केलेला आहे. वहिनींना लिहिलेलें ' माझें मृत्युपत्र ' वाचून येसू वहिनींच्या मनाची कशी कालवा-कालव झाली ती एका चरणांतच कवीने व्यक्तवून मायेच्या मनाची तडफडहि सुंदर रीतीने दाखविली आहे—

पदर भिजे वहिनीचा अश्रूंनी वाचतांच ती कविता ।
विनवी श्रीरामासी ' इंग्रज ' केतू न हा गिळो सविता ॥ ८७ ॥

तुरुंगामध्ये पत्राची भेट ही केवढी समारंभपूर्ण घटना असते याचा क्षोभक अनुभव ज्यांनी घेतला असेल त्यांनाच सावरकरांना वर्षातून एकदाच मिळणाऱ्या व अधिकाऱ्यांनी खाडाखोड करून भावनांचा कुस्करा करून टाकलेल्या पत्रामागील त्यांच्या मनाची निराशा कळून येईल. कवीचें हें पत्रवर्णन किती मार्मिक आहे पाहा—

वर्षांत पत्र एकच, पुष्प सुगंधाविणें नि चुरलेलें ।
काराधिपकरलांछित, घरचें वाचावया तयास मिळे ॥ ३१७ ॥

भाव्यांनी या काव्यांत अधिपट ( वकिलीची सनद ), विद्युत्-शाला ( पॉवर हाउस ), ध्वम् ( बॉम्ब ), सागरतारि ( बोट ) इत्यादि किती तरी सुंदर मराठी शब्द वापरले आहेत ही एक अभिनंदनीय गोष्ट आहे. ● ● ●

वि. वि. पटवर्धन

अनुक्रमणिका

# परिषद्-वार्ता

( चिटणीसांकडून )

**सभासदांना विनंती:**—परिषदेचें नवीन वर्ष सुरू होऊन तीन महिने झाले. ज्या साधारण सभासदांनी सभासदत्वाची वर्गणी ३ रु. अद्याप पाठविली नाही त्यांनी ती सत्वर पाठवावी, अशी विनंती आहे, संलग्न संस्था व पत्रिकावर्गणीदार यांनीहि चालू वर्षाची आपापली वर्गणी ( ३ रु. व ४॥ रु. ) पाठवावी.

**ज्ञानकोशकारांचा स्मृतिदिन:**—प्रतिवर्षाप्रमाणे ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मृतिदिनीं ( १० एप्रिल ) सकाळीं त्यांच्या समाधीला पुष्पांजलि वाहण्यांत आली. या प्रसंगी प्रा. चिं. धिं. जोशी, प्रा. वा. दा. गोखले, श्री. चिं. ग. कर्वे, प्रा. दि. के. बेडेकर, श्री. म. दा. साठे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. श्री. के. क्षीरसागर, डॉ. रा. शं. वाळिंबे, श्री. पां. र. अंबिके हे उपस्थित होते. सायंकाळीं प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचें कै. केतकरांविषयीं परिषदेंत व्याख्यान झालें.

ज्ञानकोशकारांची समाधि नदीच्या काठीं असल्यामुळे पुराच्या पाण्याने तिच्या आजूबाजूची जमीन ढासळत आहे. समाधीची ही स्थिति बदलणें आवश्यक असल्यामुळे ती अन्यत्र सोईच्या ठिकाणीं हलविण्याचा परिषद् प्रयत्न करीत आहे. पुणें महापालिकेचे कमिशनर मा. आ. श्री. नाईक व सिटी इंजिनिअर श्री. स. के. नेऊरगांवकर यांनी समाधीच्या बाबतींत शक्य तें साहाय्य करण्याचें आश्वासन परिषदेच्या शिष्टमंडळाला दिलें आहे.

**कै. मर्ढेकर दुखवटा सभा :**— सुप्रसिद्ध कवि कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या अकालीं व आकस्मिकपणें झालेल्या निधनानिमित्त रविवार दि. ८ एप्रिलला श्री. वि. शि. भिडे आय. सी. एस्. यांच्या अध्यक्षतेने दुखवट्याची सभा झाली. श्री. के. नारायण काळे, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. रा. भि. जोशी, प्रा. रा. श्री. जोग, डॉ. वि. म. कुलकर्णी, श्री. गोपीनाथ तळवलकर व प्रा. श्री के. क्षीरसागर यांनी भाषणें करून कै. मर्ढेकर यांना श्रद्धांजलि वाहिली.

**भेटी:**—श्रीमान् बा. ग. तथा बाबासाहेब खापर्डे व पुणें महापालिकेचे कमिशनर श्री. आ. श्री. नाईक यांनी ३–५–५६ व २–५–५६ या दिवशीं परिषदेच्या निमंत्रणानुसार भेटी दिल्या.

**देणग्या:**—नागपूरच्या लॉ रिपोर्टरचे संचालक श्री. दि. वा. चितळे व त्यांची कुटुंबीय मंडळी यांचेमार्फत परिषदेच्या वाङ्मयेतिहास योजनेस २००० रु.ची देणगी मिळाली. तसेंच, भोरचे राजे श्रीमंत सदाशिवराव रघुनाथराव पंतसचिव यांनीहि या योजनेस ५०० रु. देणगी दिली आहे. या दोन्ही देणग्या इतिहासलेखनाच्या कार्यासाठीं अंकित आहेत.

**शुद्धलेखनसमितीचें कार्य:**—शुद्धलेखनसमितीकडे आलेल्या विविध सूचनांचा विचार झाला. समितीने आता आपल्या शिफारसींच्या सूचना तयार केल्या आहेत. कार्यकारी मंडळाने २४ जूनच्या सभेंत या सूचना संमत केल्या असून आता त्या विद्यापीठें, शिक्षणखातीं व प्रमुख साहित्यसंस्था यांच्या प्रतिनिधींच्या संयुक्त बैठकींत विचारासाठी ठेवण्यांत येणार आहेत.

**कार्यालयीन सभा:**—२४ जूनला कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ व वार्षिक साधारण सभा यांच्या बैठकी झाल्या. वार्षिक इतिवृत्त, जमाखर्च व ५६–५७ चा अर्थ-

संकल्प संमत करण्यांत आला. अध्यक्षीय निवडणुकीसंबंधीचा निर्णय बेमुदत तहकूब ठेवण्यांत आला. अर्थसंकल्पांत जमेच्या बाजूस ' कार्पोरेशन देणगी ' या खात्यांत २०० रुपये समाविष्ट करावेत व इतिवृत्तांत यापुढें मागील सभासद संख्या देत जावी, या दोन सूचना संमत झाल्या. गतवर्षी २ उपकर्ते, ४ आश्रयदाते, ९ साहाय्यक, ३० हितचिंतक, ४१२ तहहयात, असे एकूण १६१० सभासद होते.

# साभार स्वीकार

१ लोकशिक्षण साहित्य प्रकाशनें—१९६।५३ सदाशिव, पुणें २. पहिली श्रेणी, दुसरी श्रेणी, तिसरी श्रेणी, खरी दया, देव कोठे आहे ? मूल्य १ ते आठ आणे.

२ श्रीसच्चिदानंद सरस्वती तथा इटगा चिदानंद स्वामी ( चरित्र ) भीमाशंकर देशपांडे, आळंदकर; विश्रामधाम आळंद ( हैद्राबाद, द. ) मूल्य १ रु.

३ निंबोणीच्या झाडामागें ( लघुनिबंध ) मंगेश पाडगांवकर; कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; २॥ रु.

४ साहित्य मीमांसा—रा. शं. वाळिंबे; चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; ७ रु.

५ शाहीर हैवती ( चरित्र आणि काव्य ) वि. कृ. जोशी, द. दि. परचुरे, संपादक—राजाभाऊ थिटे; १। रुपया

६ वेदांतील राष्ट्रदर्शन—बाळशास्त्री हरदास यांची व्याख्यानें; ना. शं. दाते २००।३ सदाशिव, पुणें २; ८ रु.

७ अमर त्याग ( नाटक )—आ. कृ. आयरे; वसुंधरा प्रकाशन, मुंबई २७; १॥ रु.

८ चित्रशाळा प्रकाशनें, सदाशिव पुणें २—

- १ अनगड मोती—न. वि. गाडगीळ; २ रु.
- २ एकनाथ—वा. गो. मायदेव; ८ आ.
- ३ साने गुरुजी—यदुनाथ थत्ते; १॥रु.
- ४ जागते देव—शरच्चंद्र गोखले; ८आ.
- ५ आपली जमीन—गो. नी. दांडेकर; ८ आणे.
- ६ पंचतंत्र कथा—( भाग १ ) शं. रा. देवळे; ८ आणे.
- ७ चार फरार—यदुनाथ थत्ते; ८ आ,
- ८ फुलवेल—वि. म. कुलकर्णी; १० आणे.
- ९ गारन्यांतील मुलाखती—शरच्चंद्र टोंगो; ८ आणे.
- १० पुनर्जन्म—सौ. माणिक पटवर्धन; ८ आणे.
- ११ मुरारींचें साळगांव—ना. ग. गोरे; ८ आणे.
- १२ मनाची मुशाफरी ( लघुनिबंध सं. ) म. ना. अदवंत; २॥ रु.
- १३ वुद्ध देव—गोपीनाथ तळवलकर; १॥ रु.
- १४ मीलन—( काव्य ) य. द. भावे; १ रु.

९ ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या—वि. मो. केळकर; वि. प्र. लिमये ५२१ सदाशिव, पुणें २;

१० शिवार ( जानपद गीतांचा संग्रह ) के. नारखेडे; लेखनवाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २; २ रु.

११ लोकशाहीचें माहेर ( डेन्मार्कचें प्रवासवर्णन )—वा. ब. कर्णिक; ग. ल. ठोकळ, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; २ रु.

१२ टणटणीची फुलें ( विनोदी काव्य संग्रह )—दिनकर देव; सौ. सुशिला देव ५८४ शनिवार, पुणें २. १॥ रु.

१३ बुद्धचरित—काशिनाथ पोतदार; के. भि. ढवळे, श्रीधर प्रकाशन, मुंबई २. १॥ रु.

१४ मराठींतील स्त्रधिन—सरोजिनी बाबर डॉ. सरोजिनी बाबर १९६।२४ सदाशिव, पुणें २; ७॥ रु.

१५ सुरस ग्रंथमाला, सोलापूर प्रकाशनें—
तुमचा आमचा संसार—वि. वि. बोकील; १–१४–०
हृद्गंध–सुमतिबाई शहा; १-१४-०
दिवास्वप्न–सुरेश शर्मा; १–१४–०
१६ स्वामिनी (नाटक) पु. व भावे; वा. य. गाडगीळ, डोंबिवली (ठाणें); २ रु.
१७ व्हीनस प्रकाशनें, पुणें २—
ती धन्य बंदीशाला !—प्र. न. जोशी; २ रु.
आराधना (काव्य) वा. ना. देशपांडे; २॥ रु.
बेसिक शाळा कशी चालवावी—रा. ना. झोळ, म. ना. झोळ; ३ रु.
१८ गोमंतकांतील सामुदायिक मालकीची ग्रामसंस्था–पद्धति—वामन अनंतशेट खलप; डॉ. ना. वा खलप, विकास, गणेशवाडी, पुणें ४; १॥ रु.
१९ भारतांत महाराष्ट्राचें अग्रस्थान ले. प्रका. एन्. जी. मेहता; जोशीबाग, कल्याण; ४ आणे
२० विनाऔषध योजना—ले. प्रका. एन्. जी. मेहता; जोशीबाग, कल्याण; २ रु.

---

# नवीन सभासद

## आश्रयदाते

१. श्री. दिवाकर वामन चितळे, नागपूर.

## तहहयात

१. सौ. इंदुमति दिवाकर चितळे, नागपूर.
२. श्री. जयंत वामन चितळे, नागपूर.
३. सौ. रजनी विद्याधर चितळे, नागपूर.
४. श्री. विद्याधर वामन चितळे, नागपूर.
५. श्री. विश्वनाथ वामन चितळे, नागपूर.
६. सौ. शालिनी विश्वनाथ चितळे, नागपूर.
७. सौ. शैला जयंत चितळे, नागपूर.
८. प्रा. श्री. गो. हुल्याळकर, पुणें २.

## साधारण

१. श्री. धोंडो सखाराम पानसे, पुणें २.
२. श्री. परशुराम पुरुषोत्तम साठे, पुणें २.
३. श्री. जनार्दन एकनाथ ओझरकर, पुणें २.
४. श्री. मुख्याध्यापक जी. एस्. अँग्लि. हायस्कूल, जळगांव (पू. खा.).
५. श्री. वसंत वाफगांवकर, खेड (पुणें).
६. श्री. वामन जहागीरदार, सोनपेठ (हैद्राबाद राज्य).
७. श्री. प्रिन्सिपॉल, लठ्ठे अध्यापक विद्यालय, अष्टे (द. सातारा).
८. श्री. अमृत रघुवीर देसाई, मुंबई ४.
९. श्री. प्रभाकर अनंत ताकवले, फरगुडे (पुणें).
१०. श्री. तुलसीराम ब. बोडखे, नागपूर २.
११. श्री. नागनाथ संतराम शितोळे, पुणें ४.
१२. श्री. प्र. चिं. शेजवलकर, पुणें २.
१३. श्री. वसंत पांडुरंग पैठणकर, अहमदनगर
१४. श्री. श्रीपाद दत्तात्रय भावे, पुणें २.
१५. सौ. इंदिरा श्रीपाद भावे, पुणें २.
१६. प्रा. सदाशिव रामचंद्र गाडगीळ, नांदेड (हैद्राबाद).
१७. श्री. दत्तात्रय नारायण चक्रदेव, कल्याण.
१८. श्री. श्रीराम व्यंकटेश मराठे, पुणें २.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
लेे-कै. वा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहींत )

२. म. सा. परिषद्-इतिहास
ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार — मूल्य ३ रु.

३. संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति
ले. प्रा. गं. बा. सरदार .... — मूल्य २ रु.

४. वाङ्मयीन समालोचन ( १९४७ ) — मूल्य २ रु.

५. शुद्धलेखननियम .... — मूल्य १॥ आ.

६. वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) — मूल्य ३ रु.

७. प्राचीन पद्यवेंचे ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २॥ रु.

८. निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २ रु.

९. साहित्यसुगंध ( प्रवेश परीक्षेस लावलेलें ) — मूल्य २ रु.

क्र. ७, ८ व ९ हीं पुस्तकें सोडून इतर पुस्तकें सभासदांस सवलतीच्या दराने मिळतील. ( टपालखर्च वेगळा )

मागणीस्थळः—चिटणीस, म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

*    *    *

## महाराष्ट्र साहित्य परिषद्, पुणें २.

**कार्यालयाच्या वेळा :**

सकाळीं — ८ ते १० व दुपारीं — ४ ते ८.

दर मंगळवारीं सुट्टी.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९८/१७ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—अरविन्द मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद, टिळक रस्ता, पुणें २



॥ श्री ॥

# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि., पुणें.

## ॥ केल्यानें होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे ॥

—समर्थ

चालू हंगामांत

एक लक्ष सत्तेचाळीस हजार नऊशें पोतीं म्हणजे

दर पोत्यास ८० रुपये भावानें

**१,१८,३२,००० रुपये किंमतीची साखर तयार झाली.**

शेअरवर १० टक्के डिव्हिडंड देण्याला फक्त तीन लक्ष रुपये नफा लागतो

दर पोत्याला पांच रुपये नफा खात्रीचा असतो.

म्हणजे

**१,४७,९०० पोत्यांवर ७,३९,५०० रुपये खात्रीचा नफा.**

**कसाहि हिशेब केला तरी शेअरवर २० टक्के डिव्हिडंड.**

भागीदारांची वार्षिक सभा जून १९५६ मध्यें आहे.

१९५४ चें १० टक्के डिव्हिडंड कंपनीनें भागीदारांना फेब्रुवारी १९५६ मध्यें दिलें.

नवीन कायद्याप्रमाणें

**१९५५ चें डिव्हिडंड सप्टेंबर १९५६ मध्यें भागीदारांना मिळेल.**

व

**१९५६ चें डिव्हिडंड एप्रिल १९५७ मध्यें मिळेल.**

९८० सदाशिव पेठ,
लक्ष्मी पथ, पुणें २.
दि. ७ मे १९५६

**मॅनेजिंग एजंट्स**





